


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्धारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका








म. सा. प. १९९६-९७

संपादक :- शंकर सारडा

अंक २७६ - जानेवारी - मार्च १९९६

" २७७ - एप्रिल - जून १९९६

" २७८ - जुलै - सप्टेंबर १९९६

" २७९ } ऑक्टोबर ९६ ते
" २८० } मार्च १९९७

जोडअंक

(कादंबरी विशेषांक)

अनुक्रमणिका

जन्मशताब्दीनिमित्त अभिवादन

**मा. काकासाहेब गाडगीळ**

जन्म - १० जानेवारी, १८९६



अनुक्रमणिका

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक मुखपत्र

# हाराष्ट्र साहित्य पत्रिका

अंक २७६, जानेवारी - मार्च १९९६

**संपादक : शंकर सारडा**

संपादन समिती:

. रा. राणे . डॉ. मधुकर हसमनीस . रत्नाकर कुलकर्णी .
वान टाकूर . प्रा. सु. प्र. कुलकर्णी . डॉ. अरविंद संगमनेरकर

प्रती किंमत २५ रुपये
र्गणी (संस्थांसाठी) १५ रुपये
दस्य शुल्क ५०० रु. वार्षिक सदस्य शुल्क ५० रु.

---

राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाने या नियतकालिकाला अनुदान दिले
या नियतकालिकातील लेखकांच्या विचाराशी मंडळ किंवा राज्य शासन
त्च असे नाही.

---

प्रकाशक : प्रमुख कार्यवाह, महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक रस्ता,
१ ०३०. (दूरभाष ४५५९६३)
स्थळ : बालोद्यान प्रेस, पुणे २.

# अनुक्रमणिका

# संपादकीय ...........

' साहित्य आस्वाद अंक ' म्हणून हा अंक आपल्यापुढे ठेवण्यात येत आहे. या अंकाचे उद्दिष्ट सन १९९५ मध्ये प्रसिद्ध झालेल्या मराठी पुस्तकांकडे वाचकांचे लक्ष वेधावे हे आहे. दिलेल्या पृष्ठसंख्येच्या मर्यादेत वीसपंचवीस पुस्तकांवरील परिचयात्मक लेखच देणे शक्य होते; आणि त्यामुळे या उद्दिष्टाची पूर्तता अंशतःच होईल ही वस्तुस्थिती आहे. साहजिकच या अंकात काही नवीन पुस्तकांचा परामर्श घेतला आहे असे अभिमानाने सांगण्याऐवजी बऱ्याच चांगल्या पुस्तकांचा समावेश करता आला नाही याचीच खंत जास्त वाटते. सन १९९५ मध्ये हजारावर नवी पुस्तके बाजारात आली. त्यापैकी निवडक शंभर-दीडशे पुस्तकांचा खरे तर परिचय करून देता येईल इतका मोठा अंक निघायला हवा. पाचसहाशे पृष्ठांचा तो सहज होईल. तेवढा मोठा अंक काढायचा तर पत्रिकेसाठी केलेली वर्षभराची आर्थिक तरतूदही अपुरी पडेल. स्वाभाविकपणेच या अंकाचे महत्त्व त्यामुळे केवळ प्रतीकात्मकच ठरते. ज्यांच्याकडे भरपूर आर्थिक व संघटनात्मक बळ आहे अशा संस्थाही याबाबत उदासीन व निरुत्साही दिसतात. साहित्य संस्कृती मंडळाच्या उद्दिष्टांमध्येही खरे तर वार्षिक नोंद व आढावे घेण्याचे एक कलम आहे. परंतु त्या दिशेने त्या मंडळाने काहीही काम केलेले नाही आणि जे असे काम करू पाहतात त्यांनाही प्रोत्साहन देण्याची जागरुकता दाखवलेली नाही.

'ललित' मासिकाद्वारे गेली अनेक वर्षे वाङ्मयप्रकारानुसार त्या त्या वर्षातील पुस्तकांचे आढावे घेण्याचा उपक्रम जारी आहे. म.सा. पत्रिकेनेही अधूनमधून तसा प्रयत्न केलेला आहे. प्रकाशन वार्षिक आणि साहित्यसूची यात त्या त्या वर्षातील पुस्तकांची सरसकट यादी संकलित करण्यात येते. महाराष्ट्र राज्याच्या ग्रंथालय नियंत्रकांचे हे काम आहे. पण त्यांच्या कामाची गती अशी की १९९५ मधील पुस्तकांची यादी प्रसिद्ध होण्यास इ. स. २००० उजाडावे लागेल. या स्वरूपाचे काम हे सूत्रबद्ध व अखंड चालू राहावे लागते. तशी यंत्रणा निर्माण करण्याच्या इच्छाशक्तीचा एकूणच अभाव दिसतो. आपल्या ग्रंथालयांतून नवनवी पुस्तके प्रसिद्ध झाल्याबरोबर वाचकांना पुरेशा प्रमाणात उपलब्ध व्हायला हवीत; ही आच कोणालाच नाही, ही मोठी दुर्दैवाची गोष्ट आहे.

मर्यादित पृष्ठसंख्येमुळे या अंकात मोजक्याच पुस्तकांचे परिचय देणे शक्य झाले. ज्यांचे परिचय दिले आहेत ती पुस्तकेही सर्व सारखीच महत्त्वाची वा मोठी आहेत असे नाही. (मी स्वतः ललित व साप्ताहिक सकाळ मध्ये सुमारे शंभर पुस्तकांवर लिहिले आहे त्यामुळे तर असे विधान मी निःसंकोच करू शकतो.) वाचकांना केलेल्या आवाहनानुसार आलेल्या पुस्तक-परिचयपर लेखांना या अंकात प्रामुख्याने स्थान देण्यात आलेले आहे. परखड समीक्षेपेक्षा व मूल्यमापनापेक्षा उदार आस्वादक भूमिका त्यात प्रधान आहे. थोडीफार भीडही पडतेच. महाराष्ट्राच्या कानाकोपऱ्यातून व बाहेरूनही पुस्तके हौस म्हणून मोठ्या संख्येने आता निघू लागली आहेत. डी.टी.पी. व प्रतिरूप मुद्रण यांच्या प्रचंड प्रसारामुळे पुस्तकाचे प्रकाशन ही आता केवळ मातब्बर प्रकाशन संस्थांचीच मिरास उरलेली नसून, थोडीफार आर्थिक जमवाजमव करण्याची तयारी असेल तर कोणालाही सहजसाध्य गोष्ट बनलेली आहे. गेल्या वर्षात समीक्षात्मक ग्रंथ आणि काव्यसंग्रह यांची संख्या मोठी आहे. त्यापैकी बहुतांश त्या त्या लेखककवींनी स्वतःच प्रकाशित केलेले आहेत. पीएच. डी. चे प्रबंधही आता कपाटात बंदिस्त राहणार नाहीत अशी चिन्हे दिसत आहेत. विद्यापीठांनी टंकलिखित प्रत, आकार आणि विशिष्ट स्पेसिंग याबाबतचे नियम शिथिल केले तर प्रबंध आकर्षकपणे डी.टी.पी. वर पुस्तकासारखेच तयार होऊ शकतील व ते पुढे प्रसिद्ध करणेही सोयीचे ठरेल हे जाता जाता नमूद करावेसे वाटते.

संशोधनात्मक लेखनावर केलेले परिश्रम वाया जाता कामा नयेत, त्या संशोधनाच्या आधारावर पुढच्या संशोधनालाही दिशा मिळते, वेग येतो, विद्यापीठांनी अशा प्रकाशनांसाठी भरघोस अनुदाने देऊन त्यांच्या प्रती महाविद्यालयांना पुरवण्याच्या योजना आखायला हव्या.

१९९५ मधील अनेक पुस्तकांवर गंभीरपणे विस्तृत लिहिण्याची गरज आहे. या अंकात अशा काही पुस्तकांची सूची उदाहरणादाखल दिलेली आहे. एकट्या पत्रिकेला हे काम करणे शक्य होणार नाही हे उघडच आहे. भावपेशी (डॉ.अरुण गद्रे), भावविलोपन : एक आकलन (डॉ. अशोक केळकर), नाटकातली चिन्हं (राजीव नाईक) या सारख्या पुस्तकांतून समीक्षाविषयक व वाङ्मयविषयक काही वेगळ्या भूमिका मांडण्यात आल्या आहेत. त्यांचीही दखल घ्यायला हवी. 'भारतीय तत्त्वज्ञानाचा बृहत इतिहास' या डॉ. ग.ना.जोशी यांच्या ग्रंथाचे दहा खंड प्रसिद्ध झाले आहेत. संतसाहित्य संदर्भ कोश खण्ड एक (डॉ. मु.श्री. कानडे), भौगोलिक शब्दकोश (र.भा. नाईक), शैक्षणिक टीपा कोश (सोहनी), गणित ज्ञानकोश (ल.वा. गुर्जर), सूचींची सूची (डॉ. सु.रा. चुनेकर) सिंधी-मराठी शब्दकोश (प्रा. लछमन परसराम हदवाणी) असे प्रकल्प एकेक व्यक्ती आपल्या हिंमतीवर पार पाडताना दिसते. ज्येष्ठ कवयित्री इंदिरा संत यांनी 'मालनगाथा' साठी अनेक वर्षे घालवलेली आहेत.

शासन, साहित्य संस्था वा विद्यापीठे अशा प्रयत्नांची कदर करत आहेत असेही दिसत नाही. या अभ्यासपूर्ण ग्रंथांच्या प्रस्तावना वाचल्या तर त्यांच्या प्रकाशनाबाबत

आलेल्या अडचणींची जाणीव होते, एवढेच नव्हे तर संशोधन क्षेत्राबद्दलच्या प्रथम प्रकाशनांना अनुदान मिळू शकते, परंतु अशा प्रदीर्घ संशोधन प्रकल्पांना कोणी वाली नाही, हे चित्र खिन्न करणारे आहे.

महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाची पुनर्रचना केली गेली आहे. ६६ व्या अ.भा. साहित्य संमेलनाचे अध्यक्ष विद्याधर गोखले यांची अध्यक्षपदी निवड झाली आहे. विश्वकोशाचे कार्य प्रा. मे. पुं. रेगे यांच्याकडे ठेवण्यात आले आहे. या मंडळाकडून जे काम होते आहे त्याबद्दल तक्रार असण्याचे कारण नाही. परंतु ज्या हेतूंसाठी शासनाने ह्या संस्थांची उभारणी केली आहे त्या हेतूंच्या पूर्ततेसाठी या संस्थांना एकेका सरकारी खात्याची कळा आणून त्यांची कार्यप्रवणता खच्ची करण्याचे टाळले पाहिजे. विश्वकोशासारखे प्रकल्प वादविषय होऊ नयेत. त्यांच्या सिद्धतेत काळाचेही भान गमावले जाता कामा नये, पंचवीस वर्षापूर्वी छापलेल्या विश्वकोशाचे जसेच्या तसे पुनर्मुद्रण करणे, मध्यंतरी त्या त्या ज्ञानशाखांमध्ये पडलेली भर दुर्लक्षित करणे हे इष्ट नाही. संपादक मंडळाची भूमिका सतत नव्या ज्ञानाची नोंद ठेवून अद्ययावत माहिती देण्याची असली पाहिजे.

मराठी भाषेची एकूणच पीछेहाट होत चालल्याची शंका सर्वांना भेडसावत आहे. पण ही पीछेहाट होत असेल तर आपणच तिला जबाबदार आहोत हेही लक्षात घेऊन मायबोलीचे महत्त्व वाढविण्यासाठी प्रयत्नशील राहायला हवे.

**नवती महोत्सव**

महाराष्ट्रातील आद्य साहित्यपीठ म्हणून महाराष्ट्र साहित्य परिषदेचे स्थान अजोड आहे. २७ मे १९९६ रोजी तिच्या स्थापनेला ९० वर्षे पूर्ण होत आहेत, पुढचे दशक हे त्यामुळे परिषदेच्या सर्वांगीण विकासाचे उद्दिष्ट पुढे ठेवून जोमदार वाटचाल करण्याचे आहे. त्यासाठी नवती महोत्सव समिती स्थापन करण्यात आली असून आम मराठी जनतेला सक्रिय सहकार्याचे आवाहन करण्यात येत आहे. या अंकात ते आवाहन प्रसिद्ध केलेले असून त्याप्रमाणे निधी संकलनालाही आरंभ झालेला आहे. परिषदेच्या सदस्यांनी भरघोस आर्थिक सहाय्य करावे आणि साहित्यकारणाचा रथ पुढे न्यावा अशी अपेक्षा आहे.

**अभिनंदन**

म.सा. परिषदेचे एक उपाध्यक्ष मृत्युंजयकार शिवाजी सावंत यांना भारतीय ज्ञानपीठाचा मूर्तिदेवी पुरस्कार नुकताच दिल्ली येथे समारंभपूर्वक प्रदान करण्यात आला. त्यांचा हा गौरव मराठी साहित्यक्षेत्राला अभिमानास्पद आहे. परिषदेतर्फे त्यांचा खास सत्कारही करण्यात आला.

परिषदेचे दुसरे उपाध्यक्ष प्रा. गो. म. कुलकर्णी यांना आधुनिक मराठी वाङ्मयाची सांस्कृतिक पार्श्वभूमी या पुस्तकासाठी महाराष्ट्र फाउंडेशनचा पुरस्कार मिळाला. त्यांचेही अभिनंदन.

तिसरे उपाध्यक्ष रामदास फुटाणे अमेरिकेचा प्रदिर्घ दौरा करून आले. आपल्या काव्यवाचनाचे व वात्रटिकांचे पन्नासावर कार्यक्रम तेथे करून त्यांनी वाहवा

मिळवली.

कॉंटिनेंटल प्रकाशनला महाराष्ट्र फाउंडेशनचा एक लाखाचा अग्रगण्य प्रकाशकाचा पुरस्कार लाभला. अनंतराव कुलकर्णी यांनी उत्तमोत्तम पुस्तके रास्त किंमतीत देण्याचे गेली साठ वर्षे जे व्रत चालवले आहे त्याला मिळालेली ही प्रशंसनीय पावतीच होय. अनंतरावांनी आपली निवृत्ती जाहीर करून आपले पुत्र अनिरुद्ध कुलकर्णी आणि रत्नाकर कुलकर्णी यांच्याकडे प्रकाशनाचा वारसा सोपवला , आणि तो उत्तम प्रकारे या पुढच्या पिढीने चालवला आहे. अनंतरावांप्रमाणेच पुढची पिढीही म.सा. परिषदेच्या कामकाजात सक्रिय होत आहे ही उल्लेखनीय बाब आहे. कॉंटिनेंटलचे मनःपूर्वक अभिनंदन.

महाराष्ट्र फाउंडेशनने जाहीर केलेले अन्य पुरस्कारही अभिनंदनीय आहेत. मालतीबाई बेडेकर व डॉ. य. दि. फडके यांना प्रत्येकी दोन लाख रुपयांचे पुरस्कार जाहीर करण्यात आले.अपारंपरिक विषयावरील सामाजिक संदर्भ लेखन पुरस्कार भीमराव गस्ती यांना 'आक्रोश' बद्दल मिळाला. वैचारिक लेखनाचा पुरस्कार प्रा, गो. म. कुलकर्णी यांना मिळाला हे वर आलेच आहे. प्रा. रावसाहेब कसबे (हिंदु - मुस्लीम प्रश्न व सावरकरांचा हिंदुराष्ट्रवाद), मिलिंद बोकील (उदकाचिया आर्ति) आणि भाऊ पाध्ये यांना प्रत्येकी २५ हजारांचे पुरस्कार लाभले. समाज प्रबोधन पत्रिका, विचारशलाका, भाषा व जीवन या नियतकालिकांना प्रत्येकी पन्नास हजारांचे पुरस्कार मिळाले. महाराष्ट्र फाउंडेशनच्या या भरघोस पुरस्कारांमुळे मराठी साहित्यक्षेत्रात चैतन्याचे व स्पर्धेचे वातावरण निर्माण होण्यास मदत होईल. या पुरस्कारांसाठी अमेरिकावासी सुनील देशमुख यांनी एक कोटी रुपयांचा निधी उपलब्ध करून दिला हे विशेष.

साहित्य अकादमीचा पुरस्कार 'राघववेळ' या 'दलित' कादंबरीबद्दल नामदेव कांबळे यांना मिळाला. वाशिमला माध्यमिक शिक्षक म्हणून ते काम करतात. अजून झोपडीवजा घरात राहतात. देशमुख आणि कंपनीने प्रसिद्ध केलेल्या त्रिखंडात्मक कादंबरीच्या या पहिल्या भागानेच अनपेक्षितपणे अकादमी ॲवार्ड मिळवून सर्वांना आश्चर्याचा धक्का दिला. श्री. कांबळे यांची भावी लेखन कारकीर्दही अशीच यशदायी ठरो.

विदर्भ साहित्य संघाने ज्येष्ठ कवी ना.घ.देशपांडे यांना साहित्यवाचस्पती पुरस्कार देऊन त्यांचा गौरव केला.

डॉ. शकुंतला क्षीरसागर यांच्या 'केशवसुतांच्या कवितेचा शैलीविज्ञानात्मक अभ्यास' या प्रबंधाला महाबँक पुरस्कार देण्यात आला.

भारतीय भाषा परिषद, कलकत्ता या संस्थेचा सह्याद्री पुरस्कार चंद्रकांत खोत यांच्या 'बिंब प्रतिबिंब' ने पटकावला. या सर्वांचे अभिनंदन.

**शंकर सारडा**
संपादक

महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे

# नवती महोत्सवानिमित्त आवाहन

महाराष्ट्र साहित्य परिषद ही महाराष्ट्राची आद्य साहित्य संस्था आहे. इतकेच नव्हे तर ती महाराष्ट्रातल्या इतर सर्व साहित्यसंस्थांची मातृसंस्था आहे. साहित्य परिषदेची स्थापना लोकमान्य टिळकांच्या आशीर्वादाने दि. २७ मे १९०६ रोजी झाली. साहित्य परिषद ही नोंदणीकृत (रजिस्टर्ड) आणि शासनमान्य संस्था असून महाराष्ट्रात आणि महाराष्ट्राबाहेरही तिचे सुमारे पाच हजार आजीव सभासद आहेत. आणि महाराष्ट्रातल्या सर्व प्रमुख शहरांमध्ये तिच्या पंचवीस शाखा आहेत. त्यामुळे केवळ पुण्यातच नव्हे तर महाराष्ट्रात तालुकापातळीपर्यंत परिषदेचे वाङ्मयीन कार्य गेली नव्वद वर्षे अव्याहतपणे चालू आहे.

**परिषदेची वास्तू**

पुण्यातल्या टिळक रस्त्यावरची परिषदेची वास्तू ही महाराष्ट्रातल्या वाङ्मयीन कार्याचे केंद्र आणि पुणे शहरातील एक महत्त्वाचे ठिकाण आहे. औंधचे राजे बाळासाहेब पंतप्रतिनिधी यांनी दिलेल्या भूखंडावर परिषदेची सुरेख वास्तू उभी आहे. ती उभारण्यात सर्वश्री वि.द. घाटे, र.लु. जोशी, श्री. म. माटे. न. वि. गाडगीळ यांचा फार मोठा वाटा आहे. वास्तूत या संस्थेचे कार्यालय, माधवराव पटवर्धन सभागृह, चिपळूणकर सभागृहातील वा.गो. आपटे संदर्भ ग्रंथालय आणि अतिथी गृह आहे.

**वाङ्मयीन आणि सांस्कृतिक कार्यक्रम**

वाङ्मयीन कार्यक्रम हा परिषदेच्या कार्याचा गाभा आहे. पटवर्धन सभागृहात वर्षभरात पन्नासपेक्षा अधिक व साहित्यिक-सांस्कृतिक कार्यक्रम परिषदेतर्फे केले जातात. त्यात महाराष्ट्रातील, देशातील तसेच परदेशातील नामवंत साहित्यिकांचा सहभाग असतो. स्मृतिदिन, व्याख्यानमाला, चर्चा, परिसंवाद, कविसंमेलने, मुलाखती, मेळावे अशा विविध प्रकारच्या वाङ्मयीन कार्यक्रमांनी परिषदेचे सभागृह नित्य गजबजलेले असते. दरवर्षी दिनांक २७ मे रोजी साजरा होणारा परिषदेचा वर्धापनदिन समारंभ हा पुण्याच्या आणि परगावच्या साहित्यप्रेमी रसिकांना आकर्षित करणारा देखणा वाङ्मयीन सोहळा असतो.

**वा.गो. आपटे संदर्भ ग्रंथालय**

वा. गो. आपटे संदर्भ ग्रंथालय हे परिषदेचे भूषण आहे. ग्रंथालयात सुमारे

४० ,००० जुने-नवे ग्रंथ , दुर्मिळ नियतकालिकांचे बांधीव अंक आणि सर्व प्रकारचे कोश व संदर्भ ग्रंथ आहेत . सुमारे बाराशे वर्गणीदार सदस्य आणि अनेक मान्यवर संशोधक व अभ्यासक ग्रंथालयाचा प्रत्यही लाभ घेत असतात .

**ग्रंथप्रकाशन**

केवळ ग्रंथालय आणि ग्रंथसंग्रहच नव्हे तर सातत्याने मौलिक ग्रंथांचे प्रकाशन हे परिषदचे एक महत्त्वाचे कार्य आहे . शुद्धलेखन नियमावली , शास्त्रीय परिभाषा कोश , संतवाङमयाची सामाजिक फलश्रुती , भाषाः अंतःसूत्र आणि व्यवहार , उदयोन्मुख कवींचा 'उमलते अंकुर' हा कवितासंग्रह यासारखे अनेक उत्कृष्ट ग्रंथ परिषदेने प्रकाशित केले आहेत . याशिवाय तीन खंडांतील 'भाषा व साहित्य' संशोधन आणि आरंभापासून १९५० पर्यंतचा मराठी वाङमयाचा पाच हजार पृष्ठांचा सहा खंडातील इतिहास प्रकाशित करून परिषदेने बहुमोल कार्य केले आहे .

**पारितोषिके**

साहित्य परिषदेतर्फे दरवर्षी विविध वाङमयप्रकारांतील उत्कृष्ट पुस्तकांना दिली जाणारी सुमारे ४० ग्रंथ पारितोषिके ही अतिशय प्रतिष्ठेची मानली जातात . सर्व वाङमयप्रकारातील पुस्तकांत या प्रकारे प्रतिष्ठेची पारितोषिके देणारी महाराष्ट्र शासनाशिवाय अन्य दुसरी संस्था नाही . आणि ही पारितोषिके दरवर्षी नियमितपणे आणि वेळेवर देणारी तर साहित्य परिषद ही एकमेव संस्था आहे .

ग्रंथ पारितोषिकांशिवाय दरवर्षी परिषदेच्या वर्धापनदिनाच्या समारंभात एका ज्येष्ट साहित्यिकाला रु . ५०००/- चा ' साहित्य परिषद पुरस्कार ' आणि ज्येष्ठ वाङमयीन कार्यकर्त्यास रु . १०००/- चा 'भीमराव कुलकर्णी ' पुरस्कार देऊन गौरव केला जातो .

**साहित्यिक साहाय्यनिधी**

अपंग , वृद्ध आणि निराधार अशा साहित्यिकांना दरमहा मानधन देण्याची साहित्य परिषदेची ही एक अपूर्व योजना आहे . यासाठी परिषदेने अडीच लाख रुपयांचा साहित्यिक साहाय्य निधी जमविला असून या निधीच्या व्याजातून दरवर्षी एका योग्य साहित्यिकाला सन्मानपूर्वक मानधन दरमहा आजन्म देण्यात येते . अनेक गरजू साहित्यिकांना या योजनेचा लाभ आतापर्यंत मिळालेला आहे .

**मराठीच्या परीक्षा**

मराठी भाषा आणि साहित्य यांच्या अध्ययनाच्या प्रसारासाठी १९३८ सालापासून साहित्य परिषद मराठीच्या विविध स्तरावरील परीक्षांचे आयोजन करीत आहे . या परीक्षांसाठी परिषदेने महाराष्ट्रात ठिकठिकाणी केंद्रे स्थापन केली असून प्रथमा , प्रवेश , प्राज्ञ , विशारद या परीक्षांचा आतापर्यंत हजारो विद्यार्थी -विद्यार्थिनींना फायदा झालेला आहे .

**विभागीय साहित्य संमेलने**

ग्रामीण भागात साहित्याचा प्रसार व्हावा आणि साहित्याची अभिरुची निर्माण व्हावी यासाठी साहित्य परिषद दरवर्षी तालुक्याच्या ठिकाणी विभागीय संमेलने भरवत असते . या संमेलनाचे संयोजन साहित्य परिषदेच्या शाखांतर्फे करण्यात येते अशी संमेलने आतापर्यंत परिषदेने यशस्वीरीत्या आयोजित केली आहेत .



अनुक्रमणिका

**'नवती महोत्सव'**

**आणि त्या निमित्ताने आयोजिलेले संकल्प**

मराठी भाषा आणि साहित्य यांच्या सर्वांगीण अभिवृद्धीसाठी ग्रंथनिर्मितीपासून ते ग्रंथ पारितोषिकांपर्यंत सर्व प्रकारचे सर्जनशील, विधायक आणि संघटनात्मक वाङमयीन कार्य अखंडपणे करणारी साहित्य परिषद आता शताब्दीकडे वाटचाल करीत आहे. येत्या २७ मे १९९६ रोजी साहित्य परिषदेला नव्वद वर्षे पूर्ण होत असून, परिषदेचा नवती महोत्सव भव्य प्रमाणात साजरा होणारा आहे. या महोत्सवाच्या निमित्ताने परिषदेचे कार्य अधिक कार्यक्षम, अधिक व्यापक आणि अधिक जोमाने होण्यासाठी परिषदेने पुढील संकल्प केले आहेत.

**भव्य, सुसज्ज इमारत**

वाढती सभासदसंख्या, विविध प्रकारचे उपक्रम आणि कार्यक्रम यासाठी परिषदेला किमान पाच-सहा मजली सुसज्ज इमारतीची अतिशय गरज आहे. गोंगाटाचा त्रास होणार नाही असे मोठे वातानुकूलित सभागृह, ग्रंथालय, संशोधन विभाग, परीक्षा विभाग, कार्यालय, अतिथी निवास, बालविभाग, महिलाविभाग इत्यादींसाठी सर्व सुविधायुक्त इमारत बांधण्याची परिषदेची योजना आहे.

**मराठी वाङमयाचा इतिहास**

आरंभापासून ते १९५० पर्यंतचा मराठी वाङमयाचा इतिहास सहा खंडात परिषदेने प्रसिद्ध केला आहे. १९५० पासून पुढचा अद्यावत मराठी वाङमयाच्या इतिहासाचा सातवा खंड सिद्ध करण्याचे परिषदेचे ठरवले आहे. तसेच अमराठी वाचकांसाठी मराठी वाङमयाचा संपूर्ण इतिहास इंग्रजीत व हिंदीत तयार करण्याचा अपूर्व प्रकल्प परिषदेने हाती घेतला आहे.

**अक्षरवाङमय योजना**

अक्षर वाङमयात गणली जाणारी मराठीतील १०० उत्कृष्ट पुस्तके केवळ हजार रुपयात मराठी वाचकांना देण्याची अभिनव योजना परिषदेने आखली आहे. या महत्त्वाकांक्षी योजनेस मूर्त स्वरूप द्यायचे आहे.

**संदर्भ ग्रंथांचे प्रकाशन**

परिषदेने यापूर्वी प्रकाशित केलेल्या अनेक संदर्भ ग्रंथांच्या आवृत्या संपल्या आहेत. या ग्रंथांना सतत मागणी असल्यामुळे त्यांच्या नव्या आवृत्यांचे प्रकाशन परिषदेस करायचे आहे.

**साहित्यिक साहाय्यनिधी**

साहित्य परिषदेने अडीच लाख रुपयांचा साहित्यिक साहाय्य निधी जमवला आहे. परंतु जास्तीत जास्त गरजू साहित्यिकांना मानधन देता यावे या उद्देशाने आणखी दहा लाख रुपयांचा हा निधी जमविण्याचा साहित्य परिषदेचा संकल्प आहे.

**हे सर्व संकल्प**
**सिद्धीस नेण्यासाठी साहित्यप्रेमींनी**
**अर्थसहाय्य करावे**
**असे**
**आवाहन आहे!**



अनुक्रमणिका

# नवती महोत्सवानिमित्त आवाहन

*सोबतच्या पत्रकातील सर्व संकल्पयोजना व उपक्रम*
*प्रत्यक्षात आणण्यासाठी किमान एक कोटी रुपयांचा निधी*
*उभारावा लागेल*
*हे लक्ष्य साध्य करण्यासाठी*
*या आद्य व ज्येष्ठ*
*साहित्य संस्थेस सभासद बंधु-भगिनी आणि*
*साहित्यप्रेमी रसिक यांनी उदारपणे अर्थसाहाय्य करावे*
*अशी विनंती आहे*
*या निधीसाठी अर्थसाहाय्य करणाऱ्यांना*
*प्राप्तीकर सवलत संदर्भात '८० जी' या प्रमाणपत्राचा*
*लाभ मिळणार आहे.*
*देणगीचा धनादेश 'महाराष्ट्र साहित्य परिषद,पुणे'*
*या नावाने पाठवावा, ही विनंती.*

**आपले**

राजेंद्र वनहट्टी
अध्यक्ष

गो. म. कुलकर्णी
रामदास फुटाणे
शिवाजी सावंत
उपाध्यक्ष

गं. ना. जोगळेकर
कार्याध्यक्ष

ना. गो. जोशी
कोषाध्यक्ष

राजा फडणीस
निमंत्रक
निधी समिती

कल्याणी दिवेकर, रत्नाकर कुलकर्णी, सु. प्र. कुलकर्णी
कार्यवाह

सर्जेराव घोरपडे, म. श्री. दीक्षित, एम. आर. परांजपे
विश्वस्त

---

**महाराष्ट्र साहित्य परिषद**
टिळक रस्ता, पुणे ४११०३०.
दूरध्वनी - ४७५९६३

# एका व्रतस्थ लेखिकेचा सन्मान

डॉ. गं. ना. जोगळेकर

श्री ज्ञानेश्वरांच्या संजीवन समाधीच्या सातशेव्या वर्षी श्री क्षेत्र आळंदी इथं भरणाऱ्या ६९ व्या अ. भा. मराठी साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदी शांता शेळके यांची निवड करून मराठी रसिकांनी एका सात्त्विक आणि व्रतस्थ लेखिकेच्या कर्तृत्वाला उत्तम दाद दिली आहे. या वर्षी शांताबाईंचं नाव पुढं आलं, तेव्हाच हा बहुमान त्यांना मिळणार याबद्दल कुणालाच शंका वाटत नव्हती. संजीवन समाधीच्या 'पूर्वसंध्ये'ला रीतसर तशी घोषणा होण्याचा उपचार पूर्ण झाला इतकंच. (अध्यक्षपदाच्या बाबतीत 'निवडणूक' या शब्दाचा अनेकजण विनाकारण धसका घेतात. गुणसंपन्न, कर्तृत्ववान लेखकांनी मनावर घेतलं तर त्यांची निवड होणं मुळीच कठीण नाही. श्री. ना. पेंडसे, विंदा करंदीकर, वसंत बापट, विजय तेंडुलकर यांसारख्या मान्यवर लेखकांनी 'अविरोध'पणाचा आग्रह सोडला तर संमेलनाचं नेतृत्व योग्य आणि अधिकारी व्यक्तीकडं जाईल. तसचं 'हे आपलं क्षेत्र नव्हे' याचं 'यथार्थ'ज्ञान इतरांना होईल.) शांताबाईंनी निवडणूक लढवायची तयारी दर्शविली हे इष्टच झालं. कारण संधी मर्यादित आणि इच्छुक भरपूर अशी विषम स्थिती असते तिथं निवडणूक हाच सन्मान्य तोडगा ठरतो.

साहित्य-संमेलनाचं अध्यक्षपद ही लेखकाला त्याच्या कार्याची मिळालेली पोचपावती असते. तसं पाहिलं तर, या पदाला कसलाही अधिकार नाही, सत्ता नाही आणि पैसा तर नाहीच नाही. असं असूनही या पदाचं आकर्षण कायम टिकून आहे. मराठी वाचकांनी वर्षातल्या महत्त्वाच्या साहित्यसोहळ्याचं धुरीणत्व सन्मानपूर्वक अशा अध्यक्षाला बहाल केलेलं असतं. त्याच्या अध्यक्षपदाची कारकीर्द अगदी छोटी म्हणजे वर्षभराचीच असते, पण त्याच्या श्रेष्ठत्वाची नोंद त्यानंतर नेहमीच होत राहते. या कायमच्या लोकमान्यतेचं आकर्षण कुणालाही वाटणं स्वाभाविक आहे. साहित्यबाह्य किंवा तात्कालिक कारणांमुळं काही कमी वकुबाच्या लेखकांना अध्यक्षपद मिळाल्याचं क्वचित दिसतं हे खरं, पण बहुतेक वेळा योग्य व्यक्तीचा सन्मान झाला असंच आढळून येतं. शांताबाईंना मिळालेलं अध्यक्षपद हा एका सुयोग्य व्यक्तीचा सन्मान आहे यात शंका नाही. पण या स्थानापर्यन्त त्या पोचू शकल्या ते पाच दशकांच्या अखंड साधनेमुळं, हे उघड आहे.

इतर अनेकांच्या तुलनेनं शांताबाईंच्या वाट्याला आलेलं बालपण उत्साहवर्धक आणि

विकासाला पोषक असं होतं. मंचरसारख्या लहानशा खेडेवजा गावात घरीदारी अनुकूल वातावरण लाभत गेल्यामुळं संस्कारांची समृद्धता त्यांना मिळत गेली. मुलामाणसांनी भरलेलं घर, वडीलधाऱ्यांनी मुलांच्या वाढीकडे जाणकारीनं पुरविलेलं लक्ष आणि परंपरा व आधुनिकता यांचा घरात झालेला चांगला मिलाफ यामुळं शांताबाईंचा बौद्धिक-मानसिक विकास निकोपपणानं झाला, यातच त्यांच्या भावी कर्तृत्वाची बीजं आहेत. संस्कारक्षम वयात एकीकडून भरपूर पुस्तकं आणि नियतकालिकं त्यांना वाचायला मिळाली आणि दुसरीकडून लोककथा, कहाण्या आणि विशेषतः परंपरागत गाणी त्यांना ऐकायला मिळाली. बंधन आणि मोकळीक यांचा समतोल साधणारं बालपण अनुभवायला मिळालं. पुस्तकांच्या जगाचं आकर्षण मनात निर्माण झालं. पण प्रत्यक्ष जगण्यातल्या धकाधकीचं भानही त्यांना येत गेलं. मोहक स्वप्नात रमणं आणि दाहक वास्तवाला भिडणं हे विशेष त्यांच्या साहित्यात दिसून येतात ते उगीच नाही. हुजूरपागेतलं शालेय शिक्षण आणि स. प. महाविद्यालयातलं वाङ्मयीन वातावरण यामुळं त्यांच्या ज्ञानसाधनेला योग्य दिशा मिळत गेली. इंग्रजी आणि संस्कृतमधल्या अभिजात साहित्याच्या अभ्यासामुळं सकस वाचनाची आवड वाढीला लागली आणि मराठीतल्या चौफेर वाचनामुळं वर्तमानाशी त्यांचं नातं कायम टिकून राहिलं. श्री. म. माटे आणि रा. श्री. जोग यांच्या वागण्याबोलण्यात अगदी टोकाचं अंतर. पण दोघेही विद्याव्यासंगी, कर्तव्यदक्ष आणि सहृदय शिक्षक. त्यांच्या सहवासात शांताबाई आल्या हा मोठा भाग्ययोग. आचार्य अत्रे यांच्या सहकारी म्हणून त्या नवयुगमध्ये काम करायला लागल्या तेव्हाच त्या लेखनाचे धडेही गिरवायला लागल्या. या वडीलधाऱ्या माणसांचं ऋण शांताबाईंनी अनेकदा व्यक्त केलं आहे.

लहानपणापासून वाढीला पोषक वातावरण मिळालं आणि जाणत्या वयात थोरामोठ्यांचं मार्गदर्शन मिळालं यात नाही म्हटलं तरी दैवाचा वाटा आहेच. पण लेखिका म्हणून शांताबाईंनी जे कर्तृत्व सिद्ध केलं ते मात्र त्यांचं स्वतःचं आहे. गेली पन्नास वर्षे त्या सतत काही लिहीत राहिल्या आहेत. पाच-सहा वर्षं जोमानं लिहावं आणि जे लिहिलं त्या भांडवलावर मानसन्मान मिळवत राहावेत असा काही लेखकांचा मार्ग असतो. सांगण्यासारखं गाठीला थोडंच असतं आणि ते दोन-चार पुस्तकांत सांगून झालं की अशा लेखकांना थांबण्याशिवाय गत्यंतरच नसतं. शांताबाईंसारखे थोडेच लेखक असे असतात की जे भरभरून लिहितात, तरी त्यांच्याजवळ सांगण्यासारखं काही शिल्लक असतंच! तात्यासाहेब केळकरांच्या हुकुमी लेखनाचं वर्णन करताना श्री. म. माट्यांनी म्हटलं आहेः स्फूर्तीची आराधना करत आणि आळोखेपिळोखे देत लिहिणं तात्यासाहेबांना मानवण्यासारखं नव्हतं. रोजच्या रोज हुकुमीपणानं लिहिण्याची सवय त्यांनी लावून घेतली होती म्हणून तर त्यांच्या हातून आयुष्यात इतकं लिहून झालं. स्वतः माटे याच पठडीतले होते आणि आचार्य अत्रे म्हणजे तर अशा लेखनातलं शिखरच म्हणावं लागेल. सतत लिहीत राहण्याचा हा मार्ग तसा खडतर असतो. अनेकदा लेखनकामाठी करावी लागते. लेखनाचा कंटाळा करून चालत नाही. शांताबाई असलं कठीण लेखनव्रत समर्थपणानं सांभाळू शकल्या कारण लेखनाची अतोनात हौस त्यांना आहे त्याप्रमाणं

तऱ्हेतऱ्हेचे वाङ्मयप्रकार हाताळण्याची जिद्दही त्यांच्या ठिकाणी आहे. एक नाटक हा प्रकार सोडला (चित्रपटासाठी त्यांनी पदं लिहिली आहेतच) तर त्यांचं लेखन सर्व वाङ्मयप्रकारांना आपलंसं करणारं आहे. कथा, कादंबरी, व्यक्तिचित्र, ललितगद्य, समीक्षा, वृत्तपत्रीय सदरलेखन असं तऱ्हेतऱ्हेचं लेखन त्या करत आल्या आहेत. अर्थात कविता आणि गीत ही त्यांच्या मर्मबंधाची ठेव आहे. स्वतःच्या कवितेबद्दल त्या कधी बोलत नाहीत, पण इतर कवि-कवयित्रींचं तोंड भरून पुस्तकाचं संपादन करण्यातही त्यांनी पुढाकार घेतला आहे. अशा पुस्तकांच्या प्रस्तावना त्यांच्या अभ्यासूपणाची साक्ष पटवणाऱ्या असतात. अनुवादासारखं कसोटी पाहणारं काम, पण तेही त्यांनी चिकाटीनं वेळोवेळी पार पाडलं आहे.

**अभ्यासू समतोलपणा**

ज्यानं चौफेर आणि विविध प्रकारचं लिहिलेलं असतं त्याला सर्व प्रकारांत सारखंच यश मिळतं असं नाही. इतक्या लेखनसंभारात डावं-उजवं होणं अटळ असतं. शांताबाईंनी काही चांगल्या कथा लिहिल्या आहेत. त्यांच्या नावावर काही कादंबऱ्याही आहेत. सुरुवातीच्या काळात त्यांनी लिहिलेली 'कोजागिरी' ही कादंबरी त्या वेळच्या मानानं पुष्कळच धीट होती. चाळिशीच्या घरातल्या पुरुषाला नवयौवनेचं वाटणारं आकर्षण आणि त्याची परिणती हा विषय या कादंबरीत त्यांनी मांडला तेव्हा त्याची थोडीफार चर्चा झाली; पण कादंबरी म्हणून शांताबाईंचं कर्तृत्व तसं अलक्षितच राहिलं आहे. व्यक्तिचित्रांबद्दल मात्र त्यांचं यश सर्वमान्य आहे. निरीक्षणाचा बारकावा, सहजसुंदर वर्णनशैली आणि विवेचनाचा मार्मिकपणा यामुळं त्यांनी रंगविलेली व्यक्तिचित्रं विलोभनीय झाली आहेत. 'वडीलधारी माणसं' वाचताना शांताबाईंच्या या लेखनप्रकारातल्या सामर्थ्याची प्रचीती येते. 'समीक्षा' या प्रकारातही त्यांचा वाटा मोलाचा आहे. साहित्यातला अमुक एक अनुभव वर्ज्य असं त्या कधीच मानत नाहीत. मात्र प्रयोगाच्या नावाखाली निरर्थक आणि साचेबंद लिहिणं त्यांना मान्य नाही. मराठीत गझल लेखनाची लाट आली आणि अनेक कवी ठोकळेबाज गझला 'पाडू लागले'. अशा वेळी एका भाषणलेखातून शांताबाईंनी या प्रकाराचा स्पष्ट शब्दांत समाचार घेतला. साहित्यातलं सत्त्व काय आणि हीण काय याची उत्तम जाण असल्यामुळं चांगल्याचं स्वागत करण्याबरोबरच अपप्रवृत्तीबद्दल नापसंती व्यक्त करणं त्यांना अगत्याचं वाटतं. मात्र समीक्षेची कुऱ्हाड हाती आली म्हणून उगीच प्रहार करत सुटण्याचा त्यांचा स्वभाव नाही. हाकाटी न करताही निषेध संयमानं नोंदता येतो हे त्यांनी आपल्या अशा लेखांमधून दाखवलं आहे. या बाबतीत रा. श्री. जोग त्यांचा आदर्श असावेत. बराबाईट अभिप्राय देण्याबाबत समीक्षकानं टाळाटाळ करू नये हे खरं, पण अशा समीक्षालेखांतून समीक्षकाचा अभ्यासूपणा, त्याचा व्यासंग, त्याची साहित्यनिष्ठा आणि त्याचा विधायक दृष्टिकोण प्रकट होणं महत्त्वाचं असतं. त्यांनी जे समीक्षापर लेखन केलं आहे, मग ते 'एकपानी' सारखं आटोपशीर असो की भाषणलेखांसारखं विस्तृत असो, त्यातून समीक्षक म्हणून शांताबाईंच्या अधिकाराची पुरेपूर कल्पना येते. शांताबाईंचं म्हणणं एखाद्या वेळी मान्य होणार नाही, पण ते पुराव्यानिशी खोडून काढणं सोपं नाही.

साक्षेपी आणि समतोल समीक्षात्मक लेखनाच्या बावतीत शांतावाई रा. श्री. जोग यांच्या विद्यार्थिनी शोभतात आणि आस्वादक आणि गुणग्राहक वृत्तीनं लिहिताना आणि बोलताना त्या माटयांचा मार्ग अनुसरतात. माटयांनी 'उपेक्षितांचं अंतरंग' हे पुस्तक लिहून साहित्यातील एक नवं दालन खुलं केलं. गुणवत्ता असूनही ज्यांच्या कार्याची पुरेशी दखल घेतली गेलेली नाही अशा अलक्षित साहित्यिकांवद्दल लिहिताना शांतावाई एक प्रकारची कर्तव्यभावना व्यक्त करीत असतात. साहित्य परिषदेत वामन मल्हारांच्या स्मृतिदिनाचं व्याख्यान देताना एका वर्षी त्यांनी आपण होऊन 'कादंवरीकारांची दुसरी फळी' हा विषय निवडला. द. र. कवठेकर, वि. वि. वोकील, वि. वा. हडप, ना. वि. कुलकर्णी या फडके-खांडेकर समकालीन कादंवरीकारांचं लेखनही कोणकोणत्या वावतीत महत्त्वाचं आहे हे सांगताना या उपेक्षितांना न्याय देण्याचंच काम त्या करीत होत्या. 'काहीतरी' या कवितासंग्रहाचे कवी ह. स. गोखले, 'खेड्यातील स्वभावचित्रे' चे लेखक मो. गो. सोमण, कवी भालचंद्र लोवलेकर, अशा अनेक गुणी लेखकांकडे जाणता -अजाणता या सदराद्वारे त्यांनी वाचकांचं लक्ष वेधलं ते या कर्तव्य भावनेपोटीच. प्रत्येक लेखक काही महान नसतो किंवा प्रत्येक कवी युगप्रवर्तक नसतो. आपली त्या त्या काळावर मुद्रा उटविणारे जे असतात त्यांचं मोठेपण मान्य केलंच पाहिजे, पण श्रेयाचे वाटेकरी इतरही अनेक असतात याचं भान आणून देण्याचं काम शांतावाईंनी उत्तम प्रकारानं केलं आहे यात शंका नाही.

**परिपक्व कविता**

इतकं विविध प्रकारचं वेधक गद्यलेखन केलेलं असूनही शांतावाई म्हटल्यावर 'कवयित्री आणि गीतकार' हीच त्यांची प्रतिमा डोळ्यापुढे उभी राहते. रविकिरण मंडळाच्या प्रभावाच्या काळात शांताबाई कविता लिहायला लागल्या. आजही त्यांचं कवितालेखन व्रतस्थपणानं चालू आहे. या पन्नास वर्षांत मराठी कवितेत पुष्कळ वादळं झाली. कुसुमाग्रज, वोरकर, अनिल, पु. शि. रेगे, ना. घ. देशपांडे, इंदिरा संत अशा अनेकांनी मराठी कविता समृद्ध केली. मर्ढेकरांनी तिचा चेहरामोहरा वदलून टाकला. नवकवींनी अनेक प्रयोग केले. गेल्या पंचवीसतीस वर्षांमध्ये कवितेत वेगवेगळे पंथ आणि प्रवाह रूढ झाले आहेत. रूपवादी, जीवनवादी, विद्रोही असे अनेक झेंडे फडकत आहेत. तंत्रशुद्ध गजलेचा जयघोषही निनादतो आहे. अशा परिस्थितीत शांता शेळके यांची कविता स्वतःशी प्रामाणिक राहून मार्गक्रमण करीत आहे. वर्षा, गोंदण, अनोळख, जन्मजान्हवी ही त्यांच्या कवितासंग्रहांची फक्त नावे नव्हेत. ते त्यांच्या काव्यप्रवासातले टप्पे आहेत. त्यांची कविता दिवसेंदिवस अधिक साधी पण प्रगल्भ, आत्ममग्न आणि विशुद्ध होत चालली आहे. काव्यलेखनाच्या प्रारंभकाळी 'अहा, ते सुंदर दिन हरपले!' अशी पारंपरिक वळणाची ध्रुवपद आणि अंतरे असलेली कविता त्यांनी लिहिली. तिच्यातही रचनेचा एक डौल आहे. या वर्षी त्यांच्या 'नाती' या कवितेतील

''वाटते तितके नमनो आपणही एकाकी, निराधार
नसते केवळ आपल्यापुरते आपले हताशपण
म्हणून नर पृढ्यातल्या काळ्याकरड्या राखेतूनही
अर्वाचन झगमगत उटतात इवले इवले अंगारकण!''

अशा ओळी वाचताना शांताबाईंची कविता किती परिपक्व, किती विचारगर्भ झाली आहे हे जाणवत राहतं. तसं पाहिलं तर, ही चौदा ओळींची कविता म्हणजे एक सुनीतच आहे, पण पारंपरिक सुनीतापेक्षा कितीतरी वेगळं! मराठी कवितेवर मनापासून प्रेम करणाऱ्यांना शांताबाईंच्या कवितेनं भरभरून दिलं आहे.

## सहजसुंदर गाणी

'भावकविता' हे शांताबाईंच्या कवित्वाचं एक रूप झालं. त्यांनी लिहिलेली 'गाणी' हाही रसिक मनाला भुलविणारा विषय आहे. गदिमांच्या पाठोपाठ शांताबाईंनीच गीत या काव्यप्रकाराची प्रतिष्ठा राखली. पंचेचाळीस वर्षांपूर्वी 'राम राम पाव्हणं' या चित्रपटासाठी त्यांनी 'शपथ दुधाची या आईच्या, फिर माघारी पोरी' हे त्यातल्या भावोत्कट प्रसंगाला अनुरूप असं सुबोध गाणं लिहिलं (त्यांच्या या पहिल्याच गीताची चाल आणि स्वर लताबाईंचा असावा हाही किती अपूर्व योग!) तेव्हापासून ही गीतयात्रा अखंड चालू आहे. दिवसभरात शांताबाईंचं एखादं तरी गाणं आपल्या कानांवर पडतंच. (त्याची नंतर मनात अनेक आवर्तनं चालू राहतात.) हल्ली तर 'गणराज रंगी नाचतो, नाचतो' अशी त्यांची गाणीच गणेशोत्सवाची चाहूल देतात. गदिमांच्या चैत्रवनाप्रमाणं शांताबाईंचा 'तोच चंद्रमा' हा गानरसिकांच्या दृष्टीनं एक ठेवाच आहे. उत्तम कवित्व, निर्दोष रचना, श्रुतिसुभगता, प्रयोगशीलता आणि प्रासादिकता या गुणांमुळं मागणीनुसार लिहिलेली असूनही शांताबाईंची गीतं या देखण्या कलाकृती ठरल्या आहेत. गीत लिहिताना 'सामान्यातल्या सामान्य माणसाशी संवाद साधता आला पाहिजे' हा पहिलाच गीतलेखनावेळचा भालजींनी सांगितलेला दंडक पाळल्यामुळं शांताबाईंची गाणी घरोघरी (आणि मनोमनी) पोचली आहेत. तीच गोष्ट त्यांच्या बालकवितांची. मुलांच्या जगाची ज्यांना खरीखुरी जाण आहे, छंद-लय-तालाचं ज्यांना भान आहे, संगीताचा कान आहे त्यांनीच बालकवितेच्या वाटेला जावं. दोनएक वर्षांपूर्वी 'सकाळ' मधून शांताबाईंची रोज एक नवी कविता प्रसिद्ध व्हायची. बालांना ती आपलीशी वाटत असेच, पण प्रौढांनाही बालपणाचा नव्यानं आनंद ती मिळवून देत असे. चांगल्या यशस्वी बालकविता लिहिणारे कवी तसे पुष्कळ आहेत. पण तांबे - मायदेवांपासून सुरू झालेली बालकवितेची परंपरा समृद्ध करणाऱ्या मोजक्या कवि-कवयित्रींमध्ये शांताबाईंचं स्थान अग्रभागी आहे हे कुणीही मान्य करील.

## प्रसारमाध्यमांची कुशल हाताळणी

सध्याच्या प्रसारमाध्यमांच्या प्रभावाची शांताबाईंना चांगली जाणीव आहे. काही वर्षांपूर्वी दूरदर्शनच्या मुंबई केंद्रावरून त्यांनी आणि डॉ. सरोजिनी बाबर यांनी सादर केलेला 'रानजाई' हा एक उत्तम जमून आलेला कार्यक्रम होता. मराठी ग्रामजीवन, आपल्या परंपरा, सण-समारंभ, मराठी स्त्रीजीवनाची विविध रूपं यांची इतकी सुंदर गुंफण या दोघींनी केली की मराठी संस्कृतीची ओळख अनेक पुस्तकं वाचून होणार नाही इतकी या एका मालिकेनं करून दिली! डॉ. सरोजिनी बाबर यांचं सगळं आयुष्यच लोकसाहित्याच्या अभ्यासाला वाहिलेलं आहे. पण सगळं माहीत असून माहीत नसल्याची भूमिका शांताबाई या मालिकेत वठवीत होत्या आणि सरोजिनीबाईंना बोलतं करीत होत्या. मर्मज्ञ अभ्यासक असलेल्या या जिवाभावाच्या मैत्रिणी सहजसंवाद करून या

नव्या माध्यमाला आपलंसं करून घेण्यात चांगल्याच यशस्वी झाल्या. एखाद्याची मुलाखत कशी रंगतदार करावी हे कौशल्य शांताबाईंनी अनेकदा प्रकट केलं आहे. मुंबईला भरलेल्या पहिल्या मराठी जागतिक परिषदेत त्यांनी आशा भोसले यांची घेतलेली मुलाखत अजून सर्वांच्या स्मरणात आहे. सात-आठ वर्षांपूर्वी आकाशवाणीच्या पुणे केंद्रावरून प्रसारित झालेली लता मंगेशकरांची शांताबाईंनी घेतलेली दोन तासांची मुलाखत म्हणजे तर अविस्मरणीय मैफलच होती! गानसम्राज्ञीच्या मोठेपणाचं कसलंही दडपण न बाळगता शांताबाईंनी ज्या प्रसन्नपणानं ही मुलाखत घेतली तिला तोड नाही. लताबाईंच्या अधूनमधून हिन्दीमिश्रित मराठीची जशी गंमत जाणवत होती तशी शांताबाईंची जाणकारी आणि त्यांनी मुलाखतीसाठी केलेली तयारी विलक्षण होती. गदिमांच्या गीतरामायणप्रमाणं लताबाईंची ही दीर्घ मुलाखत हा आकाशवाणी पुणे केंद्राचा एक ठेवाच म्हटला पाहिजे. शांताबाईंचा आवाज ऐकत राहावा इतका गोड आहे. त्यांच्या विनयशील आर्जवी बोलण्याप्रमाणं त्यांच्या गोड आवाजामुळंही ऐकणारा प्रभावित होतो. लताबाईंच्या स्वरमाधुर्याला कोणतीही उपमा दिली तरी ती अपुरीच ठरेल. शांताबाई आणि लताबाई यांचा हा सुखसंवाद ऐकताना वाटत होतं. लताबाईंचा आवाज मधासारखा गोड आहे तर शांताबाईंचा 'ज्येष्ठ'मधासारखा. (ही कोटी मी त्यांना या मुलाखतीनंतर ऐकवली तेव्हा त्या अभिजात संकोचानं फक्त हसल्या.)

शांताबाईंना भेटणं आणि गप्पागोष्टी करणं हा एक रोचक अनुभव असतो. माणसांची आणि बोलण्याची त्यांना अतोनात आवड आहे. त्यांची स्मरणशक्ती हेवा वाटावा इतकी तल्लख आहे. कुठलेकुठले संदर्भ त्यांना अचूक माहीत असतात. त्यांना बोलायला आवडतंच, पण दुसऱ्यालाही त्या बोलू देतात, त्याचं मनःपूर्वक ऐकतात! त्यांच्याशी तासभर गप्पा म्हणजे साहित्यविश्वातला चाळीस-पन्नास वर्षांचा फेरफटकाच. कधीकाळी वाचलेली पुस्तकं त्यांच्या मनात घर करून राहिलेली असतात. रजपूतांचा भीष्म, (मुचकुंददरी), शृंगेरांची लक्ष्मी (चिं.ग.भानू) फोल आशा (वि. वि. बोकील) अशी अनेक पुस्तकं आजही नव्यानं वाचायची आहेत, पण प्रयत्न करूनही कुठं मिळत नाहीत अशी हळहळ त्या बोलून दाखवतात. एखाद्या व्याख्यानाचं किंवा चर्चेचं त्याना नुसतं फोनवर आमंत्रण दिलं आणि त्यांना त्या दिवशी सवड असली तर त्या लगेच हो म्हणतात. पूर्वी त्यांनी भरपूर प्रवास केला आहे. आता मात्र प्रवासाचं त्यांना संकट वाटतं. पण तसंच कारण असलं तर त्या दगदगही सोसतात आणि आपल्या उपस्थितीनं चैतन्य निर्माण करतात. वयानं, ज्ञानानं आणि मानानं मोठ्या असूनही अगदी साध्या वाटणाऱ्या शांताबाई सर्वांनाच आपलंसं करतात.

मराठीमधे लेखिकांची संख्या आता पुष्कळच वाढली आहे. आधुनिक काळात एकोणिसाव्या शतकात लेखिका अगदी अपवादात्मक होत्या त्यामुळं त्यांच्या वाट्याला आलेलं कौतुकाचं माप झुकतं होतं. लक्ष्मीबाई टिळक, गिरिजाबाई केळकर, आनंदीबाई शिर्के, कमलाबाई देशपांडे यांच लेखनकर्तृत्व मोठं असूनही मानसन्मान त्यांच्या वाट्याला फारसे आले नाहीत. कुसुमावती देशपांडे, दुर्गा भागवत यांची संमेलनाध्यक्षपदी निवड झाली ती त्यांच्या कसदार लेखनांमुळं. इरावती कर्वे अकाली वारल्या पण आपल्या

अभिजात विद्वत्तेनं त्यांनी वाचकांची मनं जिंकली होती. मालतीबाई बेडेकर, इंदिरा संत यांना अध्यक्षपदाचा मान दुर्दैवानं मिळू शकला नाही. एक नाटकाचं क्षेत्र सोडलं तर कथा, कादंबरी, काव्य, वैचारिक लेखन, लोकसाहित्य असं चौफेर लेखन आजच्या लेखिका करीत आहेत. स्त्रियांच्या कर्तृत्वाचं क्षेत्र विस्तारत जाणं आणि त्यांचा आपल्या समाजजीवनावर ठसा उमटणं यावर लेखिकांचं स्थानही अवलंबून आहे. एखाद्या गुणसंपन्न लेखिकेमुळं एखादा नवा वाङ्मयीन प्रवाह सुरू झाला आहे आणि इतरांना त्या प्रवाहाचं आकर्षण वाटतं आहे असं चित्र अजून तरी दिसत नाही. तरीही एका महत्त्वाच्या टप्प्यावर आजच्या लेखिका पोचल्या आहेत आणि त्यांचं प्रतिनिधित्व शांताबाई करीत आहेत असं नक्कीच म्हणता येईल. अखंड वाचन, चौफेर निरीक्षण, विविध प्रकारचा जीवनानुभव घेण्याचा उत्साह, परंपरेतलं सत्त्व टिकवणं आणि नव्याबद्दल स्वागतशील असणं असा साधलेला समतोल, यंत्रयुगातल्या बदलत्या प्रसारमाध्यमाशी जमवून घेताना लोकसाहित्याला आधुनिक रूप देण्याची क्षमता दाखवणं अशा विविध प्रकारच्या गोष्टींतला मेळ साधण्यातलं यश हेच शांताबाईंच्या वृत्तीचं आणि लेखनाचं खरं बळ आहे. शांताबाईंच्या अमुक एका पुस्तकानं थक्क करणारी उंची गाठलेली नाही हे खरं असलं तरी गीतलेखनापासून सहृदय समीक्षेपर्यंतचा त्यांचा सहज संचार सामान्य वाचकांपासून चोखंदळ जाणकारांपर्यंत सर्वांनाच प्रिय झाला आहे. साधेपणातलं सौंदर्य आणि सहजपणातला गोडवा म्हणजे शांताबाईंचं आजवरचं लेखन. लेखनवाचन आणि मार्मिक गप्पागोष्टी हेच त्यांचं जिणं आहे. याशिवाय शांताबाईंची कल्पनाच करता येत नाही.

शांताबाईंनी सत्तरी ओलांडली आहे. शरीर अधूनमधून तक्रार करतं. अलिकडच्या काळात मोठे कौटुंबिक आघातही त्यांना सहन करावे लागले. पण त्यातूनही त्यांना स्वतःला सावरलं. लेखनाचे अनेक संकल्प त्यांना पुरे करायचे आहेत. वाचन, लेखन, भेटीगाठी आणि स्नेहसंवाद यात त्या कायम मग्न आहेत. गुरुवर्य रा. श्री. जोग यांच्या साठीच्या निमित्तानं निघालेल्या गौरवग्रंथात शांताबाईंनी म्हटलं होतं:

"जोगांच्या बाबतीत सांगण्यासारखी गोष्ट ही की, इतक्या वेळा त्यांच्याशी इतक्या जवळिकीने बोलणे चाललेले असतानाही, त्यांच्या वर्तनात, शब्दांत, एखाद्या ओझरत्या उद्‌गारात सुद्धा 'मला अमुक एक मिळाले नाही' असा असंतोष कधी प्रकट झाला नाही किंवा इतरांबद्दल एखादा अनुदार, अप्रशस्त उद्‌गार त्यांच्या तोंडून कधी बाहेर पडला नाही." हा जो शांताबाईंचा जोगसरांबद्दलचा अनुभव आहे तोच शांताबाईंबद्दल माझा आहे, आणि माझ्यासारख्या अनेकांचाही असाच असणार. एका व्रतस्थ लेखिकेचा उशिरा का होईना सन्मान होत आहे यासारखी आनंदाची दुसरी गोष्ट कोणती?

(**डॉ. गं. ना. जोगळेकर** २२, मनीषा गृह संस्था, कर्वेनगर, पुणे ४११०५२)

०००










जन्मशताब्दीनिमित्त लेख

# काकासाहेब गाडगीळ यांच्या ललित लेखनाची वैशिष्ट्ये

जयविजय सासिणे

शांत जलाशयात डुबुक्कन एखादा खडा टाकल्यावर किनाऱ्याच्या दिशेने विस्तारत जाणारी वलये त्यात उठतात .... तर कधी एखादा सपाट, चपटा दगड घेऊन खाली वाकून पाण्याच्या पृष्ठभागाला समांतर असा वेगात फेकल्यावर तो दोन चार उड्या घेत पाण्यात विलीन होतो अन पृष्ठभागावर वलयांची गुंतागुंत निर्माण होते.. काकासाहेबांचे ललितलेखन हे दुसऱ्या प्रकारचे आहे.... वाचकाच्या मनात विचारवलये.. भाववलये उत्पन्न करणारे.

प्रसंग एखादाच... घटना साधीसुधी... पण न. वि. गाडगीळ नावाच्या संवेदनाशील लेखकाच्या मनात विविध विचारवलये उठतात अन ती कागदावरून वाचकाच्या काळजापर्यंत पोहोचविण्यात लेखक यशस्वी होतो. त्यांच्या या विचारप्रधानते-तूनच मग साकारतात - 'आई पण नाही!', 'एकही गोड क्षण यांनी ठेवला नाही,' किंवा 'अभी तक उस्ताद नहीं मिला '... असे ललित लेख!

एका अर्थाने पाहिले तर काकासाहेबांचे ललितलेखन म्हणजे त्यांचे तुकड्या तुकड्यात प्रतिबिंबित झालेले आत्मचरित्रच आहे. जे पाहिले नाही. अनुभवले नाही असे काहीही काकांनी लिहिले नाही... चलो यार लंडनमें, नामर्दोको दुनिया जीने नहीं देती, राजू रामोशी, साताचिंचा, दुधवडीचा मार्ग, किंवा प्रधानकीचा पहिला दिवस यातून 'हप्त्याहप्त्याने स्वराज्य' सारखे हप्त्याहप्त्याने काकासाहेब आपल्याला भेटतात.

त्यांच्या ललितलेखनातून दिसते की या माणसाचे मन रमते ते माणसांत आणि ज्या समाजात ही माणसे राहतात त्या समाजात! शिवाय हा समाज नुकतेच स्वातंत्र्य मिळालेल्या काळातला आहे अन काकासाहेबांसारख्या मातब्बर राजकीय व्यक्तीने लिहिलेले हे ललितनिबंध वाचून वाचकाला दोन गोष्टींची जाणीव होते -

पहिली म्हणजे स्वातंत्र्यप्राप्तीनंतर संपूर्ण समाजाचा झालेला भ्रमनिरास.

आणि दुसरी म्हणजे अवतीभवती विनशेपटीची दोन पायांची मस्तवाल जनावरे नैतिक मूल्ये पायदळी तुडवत असताना त्यांच्या गराड्यात काकासाहेब कसे राहात असतील?



अनुक्रमणिका







मागील पाणी गढूळ आलं
पुढील पाण्यानं किती जपावं
हां हां म्हणला वणवा आला
एका झाडानं किती टकरावं?

अशी सर्व परिस्थिती असताना हा 'नरहर' न हरता लढाई कशी देत असेल?

कदाचित अवतीभवतीच्या या गढूळ गटारगंगेतून स्वच्छ निर्मळ होण्यासाठी तर ते ललितलेखन करीत नसतील?

स्वतःच्या लेखनाबद्दल काकासाहेब म्हणतात : व्यक्ती ही कितीही व्यक्तिगत असली तरी तिचा सामाजिक भाव हा तिच्या जीवनात अपरिहार्य असतो. यातील लेखांच्या अगर गुजगोष्टींच्या वाचनाने वाचकांना जरी क्षण दोन क्षण शुद्ध व सोज्वळ आनंद वाटला तरी मी स्वतःला धन्य मानीन... (स्मृतिशेष - चार शब्द)

पण काकांच्या गुजगोष्टींतून हा आनंद मिळत नाही... त्यांच्या मिस्किल अन हजरजबाबीपणाने गुदगुली न होता त्यातील उपरोधाने वाचकाचे मन घायाळ होते...

या देशातील स्वातंत्र्य पन्नाशीकडे झुकत असताना काकासाहेबांचे हे लिखाण स्वातंत्र्यानंतर पंचवीस वर्षांनी जन्माला आलेल्या आमच्यासारख्या तरुण पिढीला अंतर्मुख करते... अस्वस्थ करते. एखाद्या प्रसंगाच्या अगर संवादाच्या निमित्ताने ते जो अनुभव मांडतात त्यातील शब्दांच्या सर्पांनी डंख करताच वाचक बेहोष होऊन जातो... काँग्रेसच्या राजवटीत जे जे काळे ते ते रत्नमय प्रकाशित झाले... किंवा... 'आई पण नाही!' सारख्या निबंधातून ते शब्दांच्या पलिकडले शब्दांत व्यक्त करीत जातात अन् आपण थरकून जातो.

काकासाहेब तसे फर्डे वक्ते... अखंड जिव्हायात्री... त्यांना सार्वजनिक भाषणांचे प्रसंग वारंवार आलेले... त्यामुळे त्यांचा अनुभव असणार की श्रोतृवर्ग अफाट संख्येने असला म्हणजे वक्ता सर्वांना ऐकू जाण्यासाठी आपला आवाज उंचावतो... पण सर्वांना भाषण ऐकू गेले तरी सर्वांना पटेल असेच तो बोलतो असेही नाही...भाषणाचा हेतू एकतर अनुनयाचा असतो किंवा उपदेशकाचा! पण काकासाहेब त्यांच्या लेखनात मात्र नेमके याच्या उलट वागताना दिसतात... जणू ते श्रोत्यांकडे लक्ष न देता डोळे बंद करून अंतर्मुख होऊन लिहित आहेत असे वाटते.

काकांच्या गुजगोष्टींच्या रचनेकडे पाहिले तर लक्षात येणारे ठळक वैशिष्ट्य म्हणजे त्यांच्या निबंधाची सुरुवात बहुधा एखाद्या संवादाने होते. संवादातील ते वाक्य म्हणजे जणू त्यांना विचार करायला लावणारे स्फोटक निमित्त असते.

उदाहरणार्थ -

"ॲटलीच्या घोषणेबद्दल तुम्हाला काय वाटते?" (प्रधानकीचा पहिला दिवस)

"हे पहा, तुम्हाला अकरा मुली होतील व तुमचे अकराही जावई..." (हाय रे माझे काव्य)

"पण राजू.. तू नदीतून घोडा कसा नेलास?... " (राजू रामोशी)

"चाय तैयार है काकासाहब, चितोड आया!" (दस हजार जुर्माना...)

"रात्री डंका झाल्यावर सात चिंचांना तू प्रदक्षिणा घालून येशील?..." (साताचिंचा)

"वाट काय बघतोस... समोर चालू लाग... मी मागे आहे..." (दुधवडीचा मार्ग)

" हे पाहा. हे टांगाघोडे घरावाहेर काढल्याविना मी तेथून हलणार नाही..." (पत्रिकेत वाहनयोग.....)

.... म्हणजे लघुनिबंधाची सुरुवात चमकदार आकर्षक असावी ह्या प्रतिभासाधनी समजुतींचे काकासाहेव आशिक होते तर!

पण असे असले तरी या गुजगोष्टींतून काकांचे जे व्यक्तिमत्त्व आपल्या डोळ्यांसमोर उभे राहते त्याची विविध वैशिष्ट्ये दिसतात. त्यांची वृत्ती एका संस्कारशील मराठी घरातून आलेली जीवनाभिमुख वृत्ती आहे." या देशाविषयी... येथील किडत सडत चाललेल्या समाजातील माणसांवद्दलचा जिव्हाळा अन कणव अन उगाचच ओढून तत्त्वज्ञानाचे वेखंड उगाळून मग तो म्हणजे पहिला पांढरा केस होय अशी वाचकाची फसवणूक मात्र ते करत नाहीत. मोठ्या गोष्टींकडे ते लहान माणसाच्या नजरेने वघतात अन स्वातंत्र्यप्राप्तीनंतर निबर वनत चाललेल्या समाजपुरूष नावाच्या वैलाच्या कातडीवर वारीकसा खडा विरवलाच्या कुतूहलाने फेकून वघतात... पण समाजपुरुषाच्या वधिर कातडीवर कसलीही थरथर उमटत नाही!

यासोवतच त्यांच्या लेखनात आहे एक निर्मळ प्रांजळपणा... ज्या भूमिकेवरून ते ह्या समाजाकडे वघतात त्याच भूमिकेवरून ते स्वतःकडेही पाहतात अन मग स्वतःच्या उणिवा त्यांना जाणवतात आणि त्यांची ते प्रांजळपणे नोंद करतात. स्वतःच्या डोक्यावरील टोपी घट्ट धरून इतरांच्या टोप्या उडवण्याइतकी त्यांची लेखणी 'पटाईत' नाही म्हणूनच स्वतःच्या विचारांना व दोषांना ते हसू शकतात. स्वतःच्या हेतूवद्दलही मिस्किलपणे शंका घेऊ शकतात. विसंगती टिपणे अन ती एखाद्या प्रसंगातून, उपहासातून स्पष्ट करणे ही एक त्यांची खास लकव आहे. तसेच त्यांच्याकडे वहुश्रुतपणा आहे आणि या वहुश्रुतपणामुळेच त्यांच्या विचारांना एक प्रकारची संपन्नता प्राप्त झालेली दिसते. प्रामुख्याने कथात्मक गद्य केवळ प्रतिभा असून निर्माण करता येत नाही. त्याला अनेक ठिकाणी तपशील द्यावा लागतो आणि हा तपशील देण्यासाठी वहुश्रुततेची गरज असते. त्या विशिष्ट काळातील, परिस्थितीतील लोकव्यवहाराची माहिती असावी लागते. नुसतेच लोकव्यवहाराचे ज्ञान असून भागत नाही. ज्या क्षेत्रातील अनुभवाचे चित्रण असेल त्या क्षेत्रातील ज्ञान किंवा ज्ञान असल्याचा आभास निर्माण करण्याइतके ज्ञान - असावे लागते.

काकासाहेवांच्या ललित लेखनात वेद, उपनिषद, व्रम्हसूत्र, इसापनीती, रामायण, महाभारत, स्मृती, पुराण, सुभाषिते यांचा मुक्त हस्ताने वापर झालेला दिसतो तो त्यामुळेच. तसेच दुसरे एक वैशिष्ट्य म्हणजे या लेखणीतून त्यांनी केलेला आठवणींचा अन आख्यायिकांचा उपयोग. त्यांच्या सतत भ्रमंतीमुळे त्यांच्याजवळ ताजे अनुभव व विविध प्रदेशातील माणसांच्या आख्यायिकांचा साठा भरपूर दिसतो. पण अशा प्रसंगी

काही वेळा त्यांच्यातला 'पुणेरी' लेखकच उसळी मारून आलेला दिसतो. 'अथ विमानमार्गेण' मधील पुणेरी वावळटपणा, वजनाचा काटा - अंगावर काटा - पाकिटावर काटा असताना डॉक्युमेंटची वॅग सफाईने नेण्याची पुणेरी चपळाई, विस्किट फुकट की विकत हे ज्ञात नसल्याने फक्त चहाच घेणे, विमानात पट्टा वांधल्यावर उखळीला श्रीकृष्ण वांधलेला वाटणे किंवा एअरहोस्टेस परीशी कपोलकल्पित, गुजगोष्टी गेस्टापोच्या भीतीने टाळणारे पापभीरू पुणेकर दिसतात त्यावेळी 'हॅनोव्हर' चा हँगओव्हर आठवून आपलीच आपल्याला लाज वाटते.

काकासाहेवांची भाषा हे एक महत्त्वाचे वैशिष्ट्य आहे. त्यांची भाषा कशी सोपी, सुटसुटीत, प्रवाही अन चित्रमय असते.

"सुंदर घाट सुंदर लुगड्याला चांगला शोभिवंत पदर असावा असा दिसत होता..." (भीमेच्या प्रवाहासंगे)

"पंढरपूरच्या जवळ किंचित लहानपणाची आठवण होऊन जसे मंगळागौरीला प्रौढ स्त्रिया वागडतात त्याप्रमाणे ती थोडे वळण घेते...." (भीमेच्या प्रवाहासंगे)

मराठवाड्यातील भाषा कशी प्रेमळ, मुंवईतील भाषेसारखी प्रसाधनपूर्ण नाही की पुण्यातील भाषेप्रमाणे तिचा पदर खांद्यावर आलेला नाही." अभी तक उस्ताद नहीं मिला)

"गाडीत वसताना हातातील काठीला तलवारीप्रमाणे नकळत वागवत होतो, डोक्यावरील पांढरी टोपी जणू जिरेटोपाइतकी जड समजून जुळवून ठेवत होतो...."

"काठावरील राजवाडा सत्कृत्याच्या पाठीशी परमेश्वर असावा असा भासत होता. समोरील तलावात थकलेला वारा विश्रांतीसाठी मृदुगतीने येत आहे असे दिसत होते. तलावाच्या काठावरील वृक्षांच्या फांद्या पाण्यापर्यंत पोहोचून जणू एखादी कटिवस्त्र विचलित झालेली तरुणी हातांनी ते सावरीत आहे असे रम्य चित्र भासत होते. कितीतरी काळ मी व काळ व्हरांड्यात स्तव्ध उभे होतो..." (तिनकी वात कटै नहीं...)

काकांचे हे शब्द आपल्यावरोवर अनुभवांची, भावभावनांची गाठोडी घेऊन आलेले दिसतात. जणू फूल आणि त्याचा गंध यासारखे त्यांचे शब्द आणि अर्थ यांचा संवंध असावा! अशा वेळी - ललित वाङ्मयातील शब्द म्हणजे काव्याच्या वेलीवर उमललेल्या अम्लान प्रतिभा कळ्याच आहेत - हे कवी वी यांचे म्हणणे रास्त असल्याचे जाणवते.

या गुजगोष्टींतील हे शब्द - संवाद अगदी आपल्या रोजच्या जगातील वोलण्यासारखे वाटतात. पण ते तसे वाटत असले तरी तसे नसतात... हे संवाद दिसतात 'माधे', पण असतात 'साधलेले'... (कदाचित काकासाहेव मुरव्वी काँग्रेसमन असल्यामुळे?)... त्यांचे शब्द - संवाद काहीतरी साधण्यासाठी योजलेले असतात. ते केवळ एखाद्या व्यक्तीचे वा प्रसंगाचे निवेदन करण्यात, कथन करण्यात रंगलेले नसतात. प्रत्यक्ष सांगण्यापेक्षा सांगता येण्याच्या पलीकडचे असे काही ते सुचवू पाहतात आणि ललित वाङ्मयात या सुचवण्यालाच जास्त महत्त्व असते. केवळ सांगण्याला नाही. आपल्या लेखनात काकांनी खूपच कोऱ्या जागा सोडलेल्या आहेत आणि त्यामुळेच हे लेखन वाचकाच्या कल्पनाशक्तीला खाद्य पुरवते. अस्वस्थ करते... विचार करायला लावते

अन हेच या लेखनाचे बलस्थान आहे.

"मी आता भारताच्या मध्यात आहे तेव्हा आता भेट होणे अवघड नाही... या विनोवांच्या बोलण्यातील 'मध्य' मधील श्लेष त्यांच्या किंचित साहित्यिक मनाने काढला.

"रेल्वेस्टेशनवर ४/५ मुले भोवती घेऊन बसलेली स्त्री त्यांना भारतीय संस्कृतीचा आदर्श वाटते अन क्षणाच्या पत्नीचा परिणाम काय होतो हे तिच्याभोवती टाहो फोडणारी, ओरडणारी, चिडचिडणारी लहान मुले दाखवत होती... तिची अन्नसमस्या मी पाहिली, वस्त्रसमस्या माझे अद्यापि आधुनिक न झालेले डोळे पाहू शकत नव्हते."

"पंढरपूरला जितका भक्तिभाव अजून दिसून येतो तितका आता काँग्रेसच्या पंढरीत दिसून येत नाही.... काँग्रेसच्या राजवटीत जे जे 'काळे' ते ते रत्नमय झाले न जे जे धवल, चारित्र्यसंपन्न ते ते त्याज्य ठरले.." हे वाचून आपले मन थरकून जाते.

काकांच्या लेखनातील ही सूचकता केवळ व्यक्तिरेखा, प्रसंग, घटना इत्यादींचेच सूचन करून थांबत नाही. त्याच्या सर्व सूचनांचा हेतू असतो तो अनुभव सुचवण्यात... त्यात माणसांची विविधता आहे... प्रसंगांची विविधता आहे... जणू विविध पातळीवरील अनुभवांचे संमेलन भरलेले असावे!

काकांचे लेखन वाचून साहजिकच एक प्रश्न मनात येतो, तो म्हणजे त्यांनी हे लेखन का केले असेल? 'लिहिता' राजकारणी असंगत होत चालला होता म्हणून? की 'राजकारणी' लेखक म्हणून? मम्मटाने लेखनाची जी सहा प्रयोजने सांगितली आहेत त्यातील व्यवहारज्ञान हे प्रयोजन काकांच्या लेखनाला लागू ठरते. व्यवहारज्ञान म्हणजे लोकांचे आचारविचार, रीतिरिवाज याविषयीचे ज्ञान हे ज्ञान. काकांच्या लेखनातून वाचकाला होते. वाचकाच्या अनुभवाच्या कक्षा रुंदावल्या जातात. त्यांच्या लेखनातील मानवी स्वभावाचे विविध नमुने, त्यांचे आचारविचार हे वाचकाला नवा अनुभव देतात.

पण प्रत्यक्षात ज्यावेळी काकासाहेब स्वतः त्या घटना - प्रसंगांचा अनुभव घेत असतात तेव्हा ते चारचौघांसारखे जगत असतात किंवा कदाचित जगणे म्हणजेच अनुभव घेणे असल्याने या अनुभवांचा पुढे आपल्याला लेखक म्हणून उपयोग होईल हे त्यांच्या ध्यानीमनीही नसते. कधी ते दुसऱ्याची सुखदुःखे दत्तक घेतात तर कधी पहिल्या वर्गाच्या डब्यात तिसऱ्या वर्गाच्या डब्यातल्या उतारूच्या मनाने प्रवेश करतात. हा अनुभव घेताना कदाचित त्यांची मनोवृत्ती सामान्य माणसाच्या मनोवृत्तीपेक्षा अधिक उत्कट असावी. त्यामुळेच साध्या साध्या प्रसंगांनीही त्यांच्या मनात उलथापालथ होते. एखादा साधाच प्रसंग... द्राक्षपेट्या वाहणारी हमाल मुले अन त्यांचे उत्तर, अभी तक उस्ताद नहीं मिला! कितीतरी लोकांनी हा प्रसंग पाहिलेला अनुभवलेला असेल पण भिडला तो काकांच्या 'लेखक' मनाला.... असे का होते? कदाचित पंख्याची पाती गरगरा फिरवण्याचे सामर्थ्य वाऱ्याच्या साध्या झुळकीत नसते पण तीच झुळूक तंवोऱ्याची तार छेडण्यास पुरेशी असते म्हणून?

या गुजगोष्टींचे अजून एक वैशिष्ट्य म्हणजे पुनःप्रत्यय! आपल्या जीवनात आलेले सुखद अनुभव आपल्याला पुन्हा पुन्हा घ्यावेसे वाटतात पण ते आशक्य असते...



अनुक्रमणिका

वालपणीचे वात्सल्य . . . ती शाळकरी मैत्री . . . किंवा तारुण्यातील पहिले प्रेम . . . इ . अनुभव कितीही हवेहवेसे वाटले तरी ते हातातून निसटलेले असतात आणि कुठेतरी मनात आपण त्यांची प्रतीक्षा करत असतो . काकासाहेवांच्या गुजगोष्टी वाचकाच्या मनातील ही पुनःप्रत्ययाची भूक भागवतात .

काकासाहेवांनी या गुजगोष्टी लिहिण्यापूर्वीचा मराठीतील काळ पाहिला तर त्यावेळचे निवंधलेखन हे अवजड भाषेत व विशेषतः बोधकारी व प्रासंगिक असायचे . पारतंत्र्याच्या काळात समाजात विचार जागृतीसाठी ते आवश्यक होते . त्याचाच परिणाम म्हणून की काय काकांच्या लेखनात हा बोधाचा , जागृतीचा भाग आढळतो . स्वाभाविक वाटतो . समाजातील त्या त्या वेळचे प्रश्न व परिस्थिती मांडणे हाच वहुतेक निवंधांचा हेतू दिसून येतो . काही निवंधात केवळ रसिकांना आनंद लाभावा याच हेतूने विषय फुलवत नेला आहे . गप्पा मारत सहजपणे त्या विषयातले सौंदर्य दाखवून देण्यात न .वि .लेखणी सतत ' नवीनवी ' ठरत आली आहे .

पण ही सर्व झाली काकासाहेवांच्या ललित लेखनाची ढोवळ वैशिष्ट्ये . . . जी कुणीही मराठीचे प्राध्यापक विविध रससिद्धांत चर्चेसह म . सु . पद्धतीने बसून विद्वज्ञड करून दाखवतील .

स्वातंत्र्यानंतर पंचवीस वर्षांनी जन्मलेल्या माझ्यासारख्या तरुण वाचकाला या सर्वांहून वेगळे वैशिष्ट्य जाणवते ते म्हणजे : भ्रमनिरास !

स्वातंत्र्यापूर्वीचा तो काळ . . . असंख्य देशभक्तांच्या भावनेचा आदर राखूनही मला म्हणावेसे वाटते की ' छान छान ' काळ होता . . . . एक रोमँटिक काळ होता . . . शाळा कॉलेजात न जाणे , खादी वापरणे , सूतकताई करणे , मूठभर मीठ उचलणे , कायदा मोडणे यामुळे आपल्याला स्वातंत्र्य मिळणार आणि आपला उद्धार होणार अशा प्रतीकात्मक गोष्टींनी समाज भारलेला गेला होता . त्यातही एक नशा होती . . . धुंदी होती . . .डोळ्यांपुढे फक्त स्वातंत्र्य आणि इंग्रजांना हाकलणे हेच होते अन त्या ध्येयाकडे नजर असल्यामुळे सुराज्यासाठी . . . राष्ट्र उभारणीसाठीच्या विविध बारीकसारीक आवश्यक गोष्टी सर्रास पायदळी तुडवल्या जात होत्या . . . अन म्हणूनच मग १९४७ साली स्वातंत्र्य मिळाल्यानंतर सर्वजण म्हणू लागले - उजाडले , पण सूर्य कोठे आहे ? . . . हा भ्रमनिरास . . . अन त्यातून बळावत गेलेली हताशा . . . आम्ही काय स्वप्न पाहिले होते अन आम्हाला काय मिळाले . . . हा विरोधाभास सहन न होणारी जी संवेदनशील मने होती त्यापैकी एक म्हणजे न . वि . गाडगीळ ! . . .ज्यांनी स्वातंत्र्यासाठी साडेसहा वर्ष तुरुंगवास भोगलेला . १९३५ ते ५७ पर्यंत खासदार असलेले . . . ४७ साली पहिल्या मंत्रीमंडळातील वीज - खाण व पाटबंधारे मंत्री . . . ५८ ते ६२ या काळात पंजावचे राज्यपालपद भूषविलेले . . . अन १९६२ साली ४४ व्या सातारा साहित्य संमेलनाचे अध्यक्षपद भूषविलेले न . वि . गाडगीळ . . . त्यांच्या ललित लेखनातून दिसतो नुसता भ्रमनिरासाचा भयानक धूर ! अन याच भ्रमनिरासाचे भयानक चित्र दिसते - काँग्रेसच्या राजवटीत जे जे काळे ते ते ' रत्नमय ' झाले - या लेखात . . .

. . . ज्या गाडीला पूर्वी Coal Field Express म्हणत तिला नव्या रेल्वे मंत्र्यांच्या

कारकीर्दीत Black Diamond हे दिलेले नाव वाचूनच मन थरकून जाते. दुर्गापूर अधिवेशनातील चर्चेत काकांनी मांडलेला विचार : साऱ्या जगभर अणुबाँबच्या स्पर्धेचे क्षेत्र वाढेल आणि जग हे सतत मुळावर चढवलेल्या फाशीची दोरी लागलेल्या पण खटका अद्याप न ओढलेल्या परिस्थितीत राहील...' किती द्रष्टेपणा दिसून येतो यात!

"..रंगमंचावर काँग्रेस प्रतिष्ठेला अनुसरून काही प्रतिनिधी पाय पसरून, काही तिरपे, काही ओबडधोबड रीतीने बसलेले दिसत होते... लग्नगृही जसा अस्ताव्यस्त कारभार चालतो त्याप्रमाणे ती बैठक दिसत होती.. पार्श्वभूमीवरच्या पडद्यावरील गांधी खिन्न अन नेहरू कावलेले वाटत होते... गांधींचे सारे जीवन सत्यासाठी होते.. ते आजच्या काँग्रेस जीवनातून हद्दपार झालेले आहे. गांधीजींच्या अहिंसेला विद्यमान सरकारनेच गोळी घालून ठार केले आहे. साधे जीवन म्हणजे दारिद्र्याची पूजा ठरली आहे. उच्च विचारसरणी म्हणजे वेडगळपणा ठरला आहे. आदर्शवाद आक्रसला आहे. ध्येयवाद उदासीनतेच्या उकिरड्यावर वस्ती करून राहिला आहे. आता भोगवादाची पताका हाती घेऊन समाजाने जावे हे सोदाहरण आजचे शासनकर्ते जगाला दाखवीत आहेत आणि हे पाहूनच की काय, गांधीजी खिन्न होऊन नेहरूंकडे बघत आहेत... तुझ्या कर्तृत्वाचेच हे फळ काय? असे जणू त्यांना विचारत आहेत असे त्या चित्राकडे पाहताना वाटले. कुवतीबाहेर प्रकरण गेले म्हणजे मनुष्य जसा कावतो तशीच स्थिती नेहरूंची झाली. शेजारी बसलेल्या एका मध्यवर्ती मंत्र्याशी मी बोललो. तो म्हणाला : हम क्या करें? ये तो उनकीही देन है!.."

बास! १९५८ साली काकासाहेबांनी लिहिलेल्या उपरोक्त उताऱ्यात आमच्या बधिर मनाला 'उतारा' दिला आहे... 'स्वातंत्र्य - स्वातंत्र्य' नावाचा भातुकलीचा खेळ खेळण्याची नशा खाड्कन उतरून वास्तवाची जाण जागी होते... सानेगुरुजी उगाच नाही झोपेच्या गोळ्या घेऊन झोपी गेले! नेहरूंनीमुद्धा 'डोळस'पणे पाहण्याऐवजी निधर्मी राज्य व लोकशाही समाजवादाच्या रोमँटिक वाळूच्या ढिगाऱ्यात शहामृगी चोंच खुपसून घेतली! अन कदाचित त्यामुळेच त्या काळातील पाटबंधारे प्रकरणांबाबतच्या कटकटी आज आमच्या तिसऱ्या पिढीपर्यंत झिरपत आलेल्या असाव्यात!... ही कुणाची देणगी म्हणायची स्वतंत्र भारतात जन्माला आलेल्या आमच्या तरुण पिढीला? पक्षाला राष्ट्रापेक्षा जास्त महत्त्व दिल्यामुळे निवडणुकांना महत्त्व आले आणि आचारसंहितेचा कितीही गाजावाजा केला तरी निवडणूक म्हणजे या लोकशाही देशात पैसेवाल्यांचा खेळ ठरला याचे श्रेय कोण घेणार? जो जास्तीत जास्त मते आणि पैसा जमवेल त्याला महत्त्व कशामुळे आले? १९३७ च्या निवडणूकीत वीर नरिमन यांच्याऐवजी बाळासाहेब खेरांची मुंबई प्रांताचे पंतप्रधान म्हणून निवड कशी झाली? या सर्व प्रश्नांचे उत्तर एकच... स्वातंत्र्यानंतर सार्वजनिक जीवनात प्रचंड दंभाचा रोग बळावला... अन त्याचा हा परिणाम होता.

अशा स्थितीत न. वि. गाडगीळांसारखा संवेदनाशील माणूस... ज्याला याची कारणेही कळत होती अन 'कर्ता' ही कळत होता.. पण... पण त्या महापुरुषांच्या नांवाचे श्रद्धेचे कुंकू लावलेले असल्याने आपण सोने म्हणून जवळ केले ते पितळ तर

टरणार नाही ना? या भीतीपोटी त्यांचे वाह्यमन काही वोलू धजत नाही अन अंतर्मन त्याचा वचपा काढू लागले ते ललित लेखनात! आम्ही लोकशाहीला लायक नव्हतो... आजही लायक नाहीत याचाच भयाग्रह साक्षात्कार आमच्या तरुण पिढीला न.वि. गाडगीळांच्या थरथरत्या लेखणीतून होतो. हेच त्यांच्या ललित लेखनाचे सर्वात मोठे वैशिष्ट्य म्हटले पाहिजे!

अखेर आठवतात ते काकासाहेबांचेच शब्द : "पाप केले नाही असे माझे म्हणणे, पुण्य केले नाही अशी जग साथ देईल. पण कार्य करीत करीत जीवन व्यतीत करावयाचे आहे हेच मनात घोकत घोकत 'परमधाम' पाठीशी घालून पश्चिम दिशेकडे मी वळलो. सूर्य पूर्वेला होता व त्याच्या प्रकाशातच मी चाललो होतो या कल्पनेने माझे मन मोहरून आले." (पासपोर्ट मिळाला)

... आमच्यापुढे आज पूर्वीची ती 'पूर्व' ही 'गॅलिलियो' नाटकातील 'पश्चिमी' ओळ :

अन हॅपी इज द लँड
दॅट इज इन नीड ऑफ हीरोज!

(जयविजय सासिणे, प्लॉट नं.१३, मधुवन कॉलनी,
मखमलावाद नाका, पंचवटी, नासिक -३)

०००

## स्वागत

★ **वास्तुशास्त्र** : ए. आर. तारखेडकर, कॉस्मो प्रकाशन, धुळे. पृष्ठे १२८, बहात्तर रुपये.

★ **शिव - सूत्र** : अनुवादक - ग. वा. तगारे, इंप्रेशन्स पब्लिशिंग हाऊस, बेळगाव. पृष्ठे १२३, चाळीस रुपये.

★ **श्री दत्तगुरु यांचा नाथ सांप्रदाय आणि साधूसंतांचे कार्याची मीमांसा** : बी. एम. लोणकर, प्रकाशिका सौ. विमलावाई लोणकर, पुणे ५१, पृष्ठे ८०, पन्नास रुपये.

★ **युगाचार्य स्वामी विवेकानंद** : डॉ. शंकर अभ्यंकर, आदित्य प्रतिष्ठान, पुणे, पृष्ठे ३५०, दीडशे रुपये.

★ **दलित वैचारिक वाङ्मय** : डॉ. गंगाधर पानतावणे, प्रतिमा प्रकाशन, पुणे. पृष्ठे ४६, तीस रुपये.

★ **वियोगब्रम्ह** : रा. ग. जाधव, प्रतिमा प्रकाशन, पुणे. पृष्ठे ९३, चाळीस रुपये.

★ **सामाजिक शास्त्रे आणि अंतः संबंध** : प्रा. डॉ. ह. श्री. साने, प्रतिमा प्रकाशन, पृष्ठे १९६, पंच्याण्णव रुपये.

★ **महर्षि विठ्ठल रामजी शिंदे** : डॉ. भि. ना. दहातोंडे, प्रतिमा प्रकाशन, पृष्ठे १८८, नव्वद रुपये.

# समृद्ध रसिकतेचे चिंतनशील दर्शन

प्रा. सुजाता शेणई

गेली तीन तपे मराठी समीक्षेत सतत आणि वैशिष्ट्यपूर्ण भर घालणारे समीक्षक म्हणून प्रा. रा. ग. जाधव परिचित आहेत. 'कविता आणि रसिकता' हे त्यांचे नुकतेच प्रसिद्ध झालेले समीक्षेचे पुस्तक. पुस्तकाच्या शीर्षकावरूनही त्यातील अंतरंगाची कल्पना येते. एकूण बावीस लेख या पुस्तकात असून त्या लेखांची दोन विभागांत विभागणी होऊ शकते.

पहिला विभाग हा काही कवी आणि त्यांच्या कवितेबद्दल केलेली चर्चा यांचा तर दुसरा विभाग काव्यसमीक्षा, रसिकतेच्या समस्या, छंदमुक्त काव्यरचना, काव्यातील प्रतीकता व वस्तुनिष्ठता यांबद्दल केलेले विवेचन असा आहे.

रा. गं. च्या या रसिकावलोकनात तुकोबांपासून प्रियदर्शन पोतदार यांच्यापर्यंतचे काही निवडक कवी व कविता यांचा समावेश होतो. मात्र ऐतिहासिक आढाव्याचा प्रयत्न त्यांनी टाळलेला आहे. कवी आणि कविता यांची एक प्रकारची स्वायत्तता ते स्वीकारतात असे दिसते. तथापि ऐतिहासिक संदर्भ जिथे अन्वर्थक ठरतो, तिथे ते त्या स्वायत्ततेला अर्थपूर्ण मुरडही घालतात. रसिकता ही संस्कृतिनिरपेक्षही असते, असा अर्थ रा.ग.सूचित करतात. या दृष्टीने मोजक्याचं कवींबद्दल आजपर्यंतच्या मराठी समीक्षेने न घेतलेली 'दखल' रा.गं.नी घेतली आहे, हे या लेखांचे वैशिष्ट्य म्हणावे लागेल.

नारायण सुर्वे, बालकवी, कुसुमाग्रज, दिलीप चित्रे, रजनी परुळेकर, नामदेव ढसाळ, दया पवार यांसारख्या कवींवर आजपर्यंत खूप लेखन झाले. पण मग या पुस्तकांतील लेखांचे वेगळेपण कशात आहे? तर या लेखनात 'केशवसुतांची कविता' असा विवेचनाचा बाज नसून केशवसुतांची व्यस्ततावादी मनोवृत्ती त्यांच्याच 'भृंग' 'पुष्पाप्रत' 'फुलपाखरू' इत्यादी कवितांच्या आधारे स्पष्ट केलेली दिसते. या विवेचनाला विशिष्ट कालसंदर्भ आहे आणि रसिकतेचा व्यक्तिगत संदर्भही आहे. तुकारामांचे अभंग, त्याची ठराविक वैशिष्ट्ये असा रूढ दृष्टिकोन न स्वीकारता 'तुकारामांच्या कवितेतील अवतरणक्षमता' वेगळ्या अंगाने लेखकाने दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. काव्याची अर्थपूर्णता कधी 'खडका' सारखी स्थिरावते, तर कधी प्रवाही 'पाण्या'सारखी नवनवोन्मेषशाली असते. केशवसुत आणि तुकाराम यांच्या कवितेकडे बदलत्या ऐतिहासिक- सांस्कृतिक संदर्भात वेगळ्या अर्थाने रा.ग.पाहतात

हे लक्षात येते. नामदेव ढसाळ या दलित कवीची 'पाणी' ही एकच कविता घेऊन तिचे सौंदर्य स्पष्ट करीत असताना सामाजिक जाणिवेचीच सौंदर्यमीमांसा जाधव करतात. मोजकेच कवी घेऊन या पुस्तकाचा आराखडा बांधला काव्यविचार यांचे विस्तृत, अनेकांगी व दर्शन घडविण्यात लेखक यशस्वी झाल्याचे दिसते.

"कुठेही, कधीही व कसलेही उमललेले फूल पाहिले की मनस्वीपणे आतून वहरून यावे; त्याप्रमाणे कुठेही, कधीही, कसलीही कविता दिसली की मी मनापासून फुलून येतो" असे रा.ग. म्हणतात आणि या विधानातील मनस्वीपण त्यांच्या लेखनातही आढळून येते.

'बालकवींचे निसर्गसंवेदन' या लेखात बालकवी जसे निसर्गातील दृष्य पाहून उमलून, फुलून येत असत, त्याप्रमाणे बालकवींच्या 'फुलराणी' कवितेने हा रसिक उमलून येताना दिसतो. 'फुलराणी' या कवितेची दृश्यात्मकता जाणवत असताना, अनुभवत असताना त्याला प्रत्यक्ष 'बालकवी'च समजतात. 'फुलराणी' पेक्षा कवी समजतो आणि आपण जोपर्यंत बालकवी होऊ शकत नाही, तोपर्यंत बालकवींची कविता आकलन होणार नाही, हा निष्कर्षही तो बोलून दाखवतो. बालकवींनंतर तशा प्रकारच्या निसर्गकवितेला परंपराच नाही; त्यामुळे बालकवी हे अखंडपणे नवकवीच ठरत नाहीत काय, असा प्रश्नही तो विचारतो, या प्रकारचे प्रश्न तो स्वतःशीच उपस्थित करून प्रा. जाधव हे, खरे तर, वाचकालाही त्या प्रश्नात गोवून घेतात. त्या प्रश्नाचाच मागोवा घेण्यास प्रवृत्त करतात.

कवी म्हणून कुसुमाग्रज कुणाचे नसतात आणि खरे तर ते कुणाचेही असू शकतात, असे रा. ग. म्हणतात. कवित्वाची एक मूलभूत नैतिकता, एक प्राणभूत अध्यात्मच त्यातून सूचित होते. कवी हा फक्त कवितेचा, कवितेसाठी व कवितेपुरताच असतो असा याचा अर्थ होतो. एका क्रांतिवादी कवीला रा. ग. केवळ कवितावादी म्हणून समजून घेतात व देतात. कवी कुसुमाग्रजांबरोबरच शिरवाडकरांचे नाट्यानुभव, त्यांची शेक्सपिअरवरची भक्ती, गडकरी-खाडिलकरांचा वारसा आणि या संदर्भात आजची अभिरुची यांची चर्चा या लेखात केलेली दिसते.

या पुस्तकाचे चटकन जाणवणारे वेगळेपण म्हणजे यातील लेखांना दिलेली 'शीर्षके'. या शीर्षकांमधूनसुद्धा लेखकाचे चिंतनशील मन जाणवते. 'परात्मभावाच्या कोसळणाऱ्या दरडी'(रजनी परुळेकरांच्या कविता), भुंड्या टेकाडावरचे सावळे अक्षरब्रह्म' (दिलीप चित्रे), 'भाकरीच्या चंद्रापासून श्रद्धेच्या सूर्यापर्यंत' (नारायण सुर्वे), कमंडलूचे स्वामीत्व (दया पवार), यासारखी शीर्षके त्या त्या कवीचे व कवितांचे वेगळेपण सुचवून जातात. रजनी परुळेकरांची कविता ही 'आत्मचरित्रात्मक कविता' आहे असे रा.ग. म्हणतात, परंतु आत्माविष्कार आणि चरित्रात्मकता यातील भेदही ते स्पष्ट करतात. 'तारेच्या उग्र पीळदार गाठी सहजपणे टाळून तिच्यावर झोके घेणाऱ्या चिमण्या आणि त्यांचे ओझे न वाटणारी तार' हे या कवयित्रीच्या संवादाचे तत्त्वज्ञान! या कवयित्रीला संवाद हवा, 'पण नाटकी संभाषण नको. सगळ्याच भल्याबुऱ्या अनुभवांचा स्वीकार करणारी ही कवयित्री खरे तर कोणत्याच अनुभवाचा स्वीकार करत

नाही असे प्रा.जाधव निदर्शनास आणतात. कारण या कवयित्रीला स्वतःही स्वतःचा स्वीकार करता आलेला नाही. तिच्या कविता म्हणूनच परात्मभावाच्या कोसळणाऱ्या दरडी ठरतात. उत्कट भावनेची स्फुट कविता आणि दीर्घ भावकविता यांच्यातील नात्याचे मार्मिक विश्लेषणही रा.ग.नी करतात.

चित्र्यांच्या सर्जनशील आत्मभानात लैंगिक संवेदन हा एक सतत नवनवोन्मेषशाली असणारा प्रभावी घटक आहे. ते वापरतात ती प्रतीकेही प्राचीन आणि अर्वाचीन दोन्ही प्रकारची आहेत. दिलीप चित्रे यांची कविता समजण्यास काहीशी कठीण आहे; पण तिचा सर्वांगीण, विशेषतः कवितेची भाषा म्हणून, सूक्ष्मपणे अभ्यास करणे आवश्यक आहे असे प्रा. जाधव सुचवितात. चित्र्यांचे लैंगिक संवेदन व त्याचा काव्यरूप आविष्कार हा अधिक सूक्ष्म व तपशीलवार अभ्यासाचा विषय ठरतो. सुर्व्यांच्या कवितेतील आशय-अभिव्यक्तीचा कमालीचा संयम हा रा.ग.ना तर केवळ चमत्कार वाटतो. सुर्व्यांच्या कवितेतून लेखकाला त्यांच्या राजस वृत्तीचाही प्रत्यय येतो. सुर्व्यांच्या जीवनातील वस्तुस्थितीची अपूर्वता, सांस्कृतिक जडणघडण, त्यांची आंतरिक प्रेरणा आणि माणसाशी त्याचे जोडलेले नाते याचा सुरेख आलेख 'भाकरीच्या चंद्रापासून श्रद्धेच्या सूर्यापर्यंत' यात रेखाटलेला दिसतो. ग. दि. माडगूळकर, दया पवार, नामदेव ढसाळ यांच्या कवितांवरील लेखही चिंतनशील व रसिक मन आणि सजग संवेदनशीलतेचा प्रत्येय देऊन जातात.

'काव्यसमीक्षेच्या सीमा', 'काव्य व वस्तुनिष्ठा', 'काव्यातील प्रतीकता', 'रसिकतेच्या समस्या', 'रसिक आणि रसिकता' यांसारखे लेख काव्यविषयक आणि रसिकतेविषयी लेखकाची असलेली मते प्रकट करतात. 'काव्य म्हणजे कोणत्याही प्रस्तुताला आस्वाद्य किंवा रसात्मक बनविणारी कला, तर रसिकता ही त्या आस्वाद्याचा, रसात्मकतेचा अर्थ लावणारी कला!' काव्य आणि रसिकता याचा संबंध यातून व्यक्त होतो. कोणतीही कविता प्रत्येक सजीवाप्रमाणे एकच जीवनहेतू घेऊन अवतरते. हा तिचा जीवनहेतू लक्षात घेणे म्हणजे विशुद्ध रसिकता होय. प्रत्येक कवितेचा जीवनहेतू लक्षात घेऊन तिचे रंगरूप न्याहाळणे, हा रसिकतेचा अटळ धर्म आहे. या खेरीज रसिकतेला अन्य प्रयोजन असूच शकत नाही. पण कवितेचे जीवनहेतू एकच एक नसतात. या तिच्या विविध जीवनहेतूंच्या सम्यक आकनातूनच रसिकतेचे तत्त्वज्ञान निर्माण होते. रसिकतेचे परिश्रमपूर्वक संवर्धन करणेही आवश्यक असते. विशुद्ध आणि विकसनशील रसिकतेची कसोटीही काव्यसृष्टीतील नवनिर्मितीचे नवेपण नेमके कशात आहे, हे आळखण्यात आहे. विद्यमान रसिकता ही ऐदी, आळशी आहे, ती पुरेशी शुद्धही नाही आणि वर्धिष्णूही नाही; प्रत्येक जुन्या कवीवर व कवितेवर जे ठराविक अर्थाचे शिक्के मारण्यात आले, तेच शिक्के परत परत मारण्याचे काम आपली रसिकता करते; काही नवीन मांडण्याचे काम मराठी समीक्षेत होत नाही; तुकाराम, मर्ढेकर, तांबे यांविषयी खूप लिहिले गेले, आता आणखी काय लिहिणार म्हणून आमचे रसिक स्वस्थ बसतात; या बद्दलची खंतही प्रा.जाधवांनी व्यक्त केली आहे. ते स्वतः ही मरगळ दूर करण्याचा प्रयत्न करतात. आजपर्यंत बालकवींच्या 'औदुंबर' या

कवितेवर खूप लिहिले गेले, पण या पुस्तकात 'औदुंबर : एक परिस्थितिकीय (इकॉलॉजिकल) आकलन' हा लेख आला आहे. तो नावीन्यपूर्ण आहे. बालकवींच्या स्वतःच्या आणि मराठी स्वभावाच्या पर्यावरणीय संवेदनाचे काही विशेष या कवितेत जाणवतात, असे त्यांनी दाखवून दिले आहे.

'काव्यातील प्रतीकता' 'कविता आणि क्रांती' 'छंदमुक्त काव्यरचना' यांसारख्या अभ्यासपूर्ण लेखांतून कविता, काव्यरचना, काव्यविचार, काव्यनिर्मितिप्रक्रिया, आणि प्रतीकात्मकता यांचा परस्परसंबंध ह्यांसारख्या घटकांचा पुनर्विचार केलेला आढळतो.

एकूणच या पुस्तकातून जाणवते ते लेखकाचे अभ्यासपूर्ण आणि चिंतनगर्भ असे काव्यमंथन! पुष्कळ ठिकाणी रा.ग. स्वतःच प्रश्न मांडतात आणि स्वतःच त्याचा ऊहापोह करतात. मराठी कविता आणि रसिकता यांची पावले बरोबरीने टाकली जात नाहीत असा सूरही या लेखनातून व्यक्त होतो. एका बाजूला नवनवीन कवी पुढे येतात; पण रसिक व रसिकता पुढे येताना दिसत नाहीत. जुन्या परंपरेकडे पुनःपुन्हा नव्याने वळायला हवे, असेही प्रा. जाधव सुचवितात. स्वतः समजावून घेत घेत वाचकांना समजावून सांगणे, अशी खास पद्धत दिसते. प्रत्येक कवी, त्याची कविता ही स्वतंत्र प्रमेयेच असतात. त्यामुळे कोणतीही एकच एक ताठर, तात्त्विक अंतिम भूमिका ते घेत नाहीत.

सर्वच लेख आटोपशीर आहेत. समर्पक संज्ञांचा वापर केलेला असून इंग्रजीतील पारिभाषिक शब्दही यथास्थळी आवर्जून दिलेले आहेत. 'विस्तृत काव्यब्रह्मांडाचे मर्यादित जागेत केलेले आटोपशीर पण अभ्यासपूर्ण विवेचन' असे या पुस्तकाचे स्वरूप आहे. मराठी समीक्षेला दिशा देणारे, रसिकतेला आलेली मरगळ दूर करणारे आणि पुन्हा नव्याने चिंतन करून अधिक सहज होण्यास उपयुक्त ठरणारे असे हे लेखन निश्चितच स्वागतार्ह ठरते.

(कविता आणि रसिकता : रा. ग. जाधव, प्रतिमा प्रकाशन, पुणे ३०, पृष्ठे १६०, शंभर रुपये)

(प्रा. सुजाता शेणई, गारमाळ, वडगाव - धायरी, पुणे ४११०४१)

०००

## नवीन आजीव सदस्य

### आळंदी देवाची

| | |
|---|---|
| बबनराव रामचंद्र रानवडे | सुरेश धनराज वडगावकर |
| शरश्चंद्र मंतू दराडे (पाटील) | सुरेश नरहर गांधी |
| मारुती कृष्णाजी थोरात | शाम हरकचंद कोलन |
| श्रीकांत श्रीपाद अष्टेकर | नंदकुमार झुंबरचंद्र वडगावकर |
| विलास गोपाळ कुऱ्हाडे | अशोक वासुदेव वुचके |
| भारत पंढरीनाथ गोवे | कांतीलाल नंदलाल चोरडिया |
| यशोधन किसनमहाराज साखरे | विष्णू भिकाजी नापरकर |

साहित्य : आस्वाद आणि समीक्षा : डॉ. रमेश नारायण वरखेडे

# विविध साहित्यकृतींवरील बारा लेख

सुधीर देवरे

डॉ. रमेश वरखेडे यांच्या बारा समीक्षात्मक लेखांचा 'साहित्य : आस्वाद आणि समीक्षा' हा संग्रह नुकताच प्रसिद्ध झाला. १९७६ ते १९९४ या काळात वेगवेगळ्या नियतकालिकांतून हे लेख प्रसिद्ध पावलेले आहेत.

'मुक्तामालेचा आकृतिबंध आणि संभवनीयतेचे तत्त्व'; 'पु. शि. रेगे यांची कथा 'रेणू : मानवी संज्ञापनप्रक्रियेचा शोध', 'औदुंबर आणि मराठी काव्यसमीक्षा', 'विद्याधर वैद्य यांच्या कवितेतील आत्म-वस्तु-निष्ठा', 'नरहर कुरुंदकर यांचा काव्यविचार', 'अतिवास्तववादी साहित्याचे स्वरूप', 'मराठीतील लयतलचर्चा' आदी शीर्षकांवरूनही पुस्तकाचे स्वरूप ध्यानात यावे.

या पुस्तकाला 'भ्रमर वाटेच्या पाऊलखुणा' नावाची छोटीशी प्रस्तावना स्वतः डॉ. रमेश वरखेडे यांनी लिहिली आहे. तीत 'आस्वाद' आणि 'समीक्षा' या वाङ्मयीन संज्ञाचे सुबोध आणि स्पष्ट विवेचन करून आस्वाद आणि समीक्षेत परस्पर सामंजस्य असते, ही जाणीव ठेवून हे पुस्तक वाचले जावे (पृ.३) अशी अपेक्षा व्यक्त केली आहे.

पु. शि. रेगे यांच्या कथेसंदर्भात लिहिताना श्री. वरखेडे मराठी नवकथेतल्या चढ उताराचा एक आलेख उभा करून जातात. उदाहरणार्थ, "एका अर्थाने १९५६ पर्यंत नवकथा प्रस्थापित झाली होती, पण तरीही तिचे कौतुक काही मिटलेले नव्हते. भाव्यांचे कथालेखन काहीसे कंटाळवाणे व्हायला लागले होते आणि गोखल्यांच्या कथेत वाजवीपेक्षा जास्त सजवलेली भाषा आणि पिंजलेली स्वभावचित्रे आवृत्त होत होती तरी हे कौतुक थांबलेले नव्हते. तर दुसरीकडे अं. शं. अग्निहोत्री, शांताराम, वसुंधरा पटवर्धन, जी. ए. कुलकर्णी, वि. शं. पारगावकर, मंगेश पदकी, विद्याधर पुंडलीक, तारा वनारसे, कमल देसाई, विजया राजाध्यक्ष अशा लेखकांची आणखी एक नवी फळी तयार होत होती. अशा परिस्थितीत लेखनाचे सातत्य आणि विपुलतेचा अभाव असलेली रेग्यांची गोष्ट दुर्लक्षित राहिली." (पृ.६) या निरीक्षणाला मराठी नवकथेच्या इतिहासात संदर्भमूल्य प्राप्त होते.

प्रभाकर पाध्ये यांच्या 'त्रिसुपर्ण' कथासंग्रहावर लिहिताना पाध्ये या कथाकाराबरोबरच समीक्षक पाध्ये यांचाही विचार डॉ. वरखेडे यांनी केला आहे. कथाकार पाध्ये आणि समीक्षक पाध्ये यांचा तौलनिक आलेक अभ्यासकांसमोर दृगोचर होत जातो.

उदाहरणार्थ, "मानवाच्या शक्ती या मानवपूर्व प्राण्यांतील काही शक्तींची विकसित रूपे असू शकतील" असे पाध्ये यांनी 'सौंदर्यानुभव' या ग्रंथाच्या प्रस्तावनेत म्हटले आहे. 'द्वा सुपर्णा' या कथेत पाध्ये पक्ष्यांचे वर्तन आणि माणसाचे वर्तन यातील साधर्म्य व वैधर्म्य यांचे दर्शन घडवितात. तो या दृष्टीने मानवी शक्तीच्या आदिरूपांचा शोध घेण्याचाच एक प्रकार म्हणावा लागेल. हे साधर्म्य व वैधर्म्य यांचे एकत्रित दर्शन घडविणे यामागे लेखकाचा एक दृष्टिकोन (Point of view) दडलेला आहे." (पृ. २४,२५) क्लिष्ट आणि अनाकलनीय भाषा न वापरता समीक्षा कशी असावी, याचा प्रत्यक्ष वस्तुपाठ म्हणजे ही समीक्षा, असे म्हटले तर वावगे ठरू नये.

विद्याधर वैद्य या कवीच्या मृत्यूनंतर त्यांच्या कवितांची ओळख प्रथम त्र्यं. वि. सरदेशमुख यांनी सत्यकथेतून करून दिली. त्यानंतर मा. य. वैद्य, पुरुषोत्तम पाटील, वा. रा. सोनार यांनी कै. वैद्य यांचा 'खिडकीतल्या कविता' नावाचा कवितासंग्रह १ फेब्रुवारी १९७६ ला प्रकाशित केला. डॉ. रमेश वरखेडे यांनी या कवितेवर आलोचना, सप्टेंबर १९७६ च्या अंकात 'विद्याधर वैद्य यांच्या कवितेतील आत्म-वस्तुनिष्ठा' नावाचा समीक्षात्मक लेख लिहिला. या व्यतिरिक्त या कवितासंग्रहाची दखल कोणी घेतलेली दिसत नाही.

बालकवी यांच्या 'औदुंबर' कवितेवर आजपर्यंत खूप समीक्षा झाली. वेगवेगळे आकलन, दृष्टिकोन, अर्थ उलगडून दाखवण्यात आले आहेत. यातील काहींच्या समीक्षेच्या अनुषंगाने औदुंबर कविता आणि इतर समीक्षा यांचा विचार करत एक निराळाच दृष्टिकोन मांडलेला दिसतो.

'मराठीतील लयतत्त्वचर्चा' या निबंधात मर्ढेकरांचा 'तो' लय, प्रभाकर पाध्ये यांची लयकल्पना, अशोक रानडे यांचा लयविचार, पु.शि.रेगे यांचा (स्त्रीलिंग) लयविचार, आणि शरश्चंद्र मुक्तिबोध यांना अभिप्रेत असलेला लयविचार असा सविस्तर आढावा घेत मर्ढेकरांच्या लयतत्त्वाची मर्यादाही डॉ.वरखेडे यांनी अधोरेखित केली आहे. सौंदर्यशास्त्राच्या अभ्यासकाला हा निबंध मार्गदर्शक ठरावा.

'अतिवास्तववादी साहित्याचे स्वरूप' या निबंधात डॉ. वरखेडे यांनी संकल्पनेचे स्पष्टीकरण, मूळ पाश्चात्य कल्पना, चित्रकलेतील अतिवास्तव स्वरूप आणि मराठी साहित्यातील चित्रण, स्पष्ट करून दिलीप चित्रे यांच्या 'केसाळ काळंभोर पिलू' या कथेतील अतिवास्तववादी स्वरूपाचे उपयोजन उदाहरणादाखल विचारात घेतले आहे.

एक संदर्भग्रंथ म्हणून या पुस्तकाचे मराठी समीक्षेला योगदान मिळत आहे.

(साहित्य : आस्वाद आणि समीक्षा' : डॉ. रमेश नारायण वरखेडे, चेतश्री प्रकाशन, अमळनेर, पृष्ठे १४०, साठ रुपये)

(सुधीर देवरे, टेलिफोन एक्स्चेंज, सटाणा - ४२३ ३०१)

०००

कविता : संकल्पना, निर्मिती आणि समीक्षा : डॉ. वसंत पाटणकर

# काव्यविषयक बदलत्या कल्पनांचा मागोवा

डॉ. नीलिमा गुंडी

डॉ. वसंत पाटणकर यांचे हे पुस्तक म्हणजे आधुनिक काव्यविषयक एक चांगला संदर्भग्रंथ आहे. काव्यविषयक बदलत्या संकल्पनांचा मागोवा घेताना त्या त्या काळाचे वैचारिकदृष्ट्या असलेले भान यातील लेखनात प्रतिबिंबित झाले आहे. तसेच काव्याच्या स्वरूपाची सखोल चिकित्साही यात अंतर्भूत आहे.

काव्य-संकल्पनेविषयीचा पहिला विभाग सर्वात मोठा असून त्यात पाच लेखांचा समावेश आहे. 'कवितेची' संकल्पना आणि 'काव्यप्रकारां'ची संकल्पना मांडणारे लेख तात्त्विक चिकित्सा करणारे आहेत. साहित्य हे काही प्रमाणात स्थिर, तर काही प्रमाणात लवचिक असते; हे गृहीत धरून लेखकाने येथे विट्‌गिनस्टाइनच्या कुलसाम्याचा विचार मार्गदर्शक मानला आहे. भावकवितेला केंद्रस्थानी ठेवून, अन्य काव्यप्रकारांचे स्थान केंद्र व परीघ या दरम्यान ठरवायचा प्रयत्न यात आहे. हृद्य मांडणी, लयबद्धता, प्रतीकात्मकता, संवेद्यता. सेंद्रिय एकात्मता इ. काव्यवैशिष्ट्यांचा यात सविस्तर उलगडा केलेला आहे.

काव्यप्रकारांचे वर्गीकरण करताना लेखक आशयात्मक, संरचनात्मक आणि सादरीकरणात्मक तत्त्वांवर भर देतो. या वर्गीकरणात हवाबंद कप्पे नसणार, याची त्याला कल्पना आहे. यातील लेखनात पाश्चात्य विचारांचा जितका मागोवा घेतलेला आहे; त्यामानाने भारतीय साहित्यशास्त्रातील विचारांचा मागोवा घेतलेला नाही. तसेच यापूर्वी काव्यप्रकारांच्या काटेकोर वर्गीकरणाचे जे महत्त्वपूर्ण प्रयत्न झाले (उदा : ना. म. भिडे यांचा काव्यविचार) त्यांचा उल्लेख येथे अपेक्षित होता.

'केशवसुतांचा पंथ कोणता?' हा लेख केशवसुतांच्या कवितेतील आशयसूत्रांचा शोध घेत कवीचा पंथ 'रोमँटिक' असल्याचे पटवून देतो. वास्तविक हे प्रतिपादन आजवरच्या आकलनापेक्षा फार वेगळे आहे; असे म्हणता येणार नाही. तरीही रोमँटिसिझममागील संदर्भचौकट सांगणारे यातील विवेचन अभ्यासपूर्ण आहे.

'मराठी कवितेतील नवता' हा या पुस्तकातील सर्वात महत्त्वाचा लेख आहे. यात गुरुवार्तेला आधुनिकवादामागील संवेदनेचे केलेले विश्लेषण, नवकविता जाणून घ्यायला मदत करते. कालसापेक्ष (मर्ढेकरांची कविता) व कालनिरपेक्ष (पु. शि. रेगे यांची कविता) असे नवतेचे दोन प्रवाह मानून लेखकाने मर्ढेकर समकालीन कवींच्या

कवितांतील नावीन्य पारखून घेतले आहे .

'आजची मराठी काव्यसमीक्षा' हा यातील लेख मराठी काव्यसमीक्षेबाबतचे असमाधान व्यक्त करतो . आजच्या काव्यसमीक्षेचे समग्र चित्र डोळ्यांसमोर येईल असे विवेचन यात नाही . येथे प्रचलित अशा समीक्षापद्धतींचा - त्यातून व्यक्त होणाऱ्या काव्यसंकल्पनांचा विचार आला आहे . आपल्याकडील चरित्रात्मक , आस्वादात्मक इ . काव्यसमीक्षापद्धती ढोबळ रसग्रहण किंवा अवांतर माहिती यात कशा अडकून पडतात , याचे पाटणकर सोदाहरण विवेचन करतात . त्याच वेळी ते सुधीर रसाळ , गंगाधर पाटील , अशोक केळकर इ . च्या नवी मर्मदृष्टी देणाऱ्या समीक्षेचे श्रेयही मान्य करतात .

पुस्तकाच्या 'निर्मिती' या दुसऱ्या विभागात परीक्षणे , टिपणे , अनुभवनिवेदन अशा अंगाने केलेले लेखन आहे . "कविता फुलते अशी" या पुस्तकाचे यातील परखड समीक्षण पाटणकरांच्या काव्यनिर्मितिविषयक कल्पना आपल्यापर्यंत पाहोचवते . त्यात निर्मितिप्रक्रियेतील गूढतेवर अकारण भर देण्याविषयी तीव्र मतभेद नोंदवला आहे . (ही प्रक्रिया यांत्रिक नाही , याची जाणीव त्यांनाही आहे .) तसेच काव्याचे मूल्यमापन निर्मिती प्रक्रियेवर अवलंबून नसते ; हेही त्यांनी स्पष्ट केले आहे . 'काव्यातील तंत्र आणि उत्स्फूर्तता' हा लेखही निर्मितीतील उत्स्फूर्ततेवर कवी आणि समीक्षक या दोहोंकडून कसा भर दिला गेला ; याची वाङ्मयीन मीमांसा करणारा आहे . स्वतःच्या 'भिंत' या कवितेची निर्मितिप्रक्रिया सांगणारा यातील लेख मात्र काही बाबतीत अपुरा वाटतो . काव्यनिर्मितिप्रक्रियेत एकदा सुचण्यापासून लिहिण्याच्या कालखंडालाही महत्त्वपूर्ण मानले की परिष्करणे महत्त्वाची ठरतात . येथे "आधीचे कागद जपून ठेवायला हवेत , हे कळूनही वळले नाही' असे ते म्हणतात . त्यामुळे निर्मितिप्रक्रियेचे विश्लेषण यात येत नाही .

पुस्तकातील काव्यसमीक्षेचा तिसरा विभाग काहीसा अपुरा वाटतो . वास्तविक पाटणकरांच्या 'आजकालच्या काव्यसमीक्षे' विषयीच्या टीकेमुळे त्यांच्या समीक्षेविषयी अपेक्षा निर्माण होतात . या विभागात तीन कवयित्रींच्याच काव्यसंग्रहांचे परीक्षण आहे . त्यातही प्रभा गणोरकर ("व्यतीत") आणि सुनीता जोशी ("आत्मरंग") यांच्या काव्यसंग्रहात आत्मलक्ष्यी जाणिवाच प्रभावी असल्यामुळे परीक्षणे चांगली असली तरी त्यात काहीसा एकसुरीपणा येतो . सुनंदा भोसेकरांच्या "अनोळखी प्रदेशात" या संग्रहातील दुर्बोधतेतून गूढ जाणीव व्यक्त करण्याचा प्रयत्न फसवा कसा आहे याचे पाटणकर मार्मिक विश्लेषण करतात . परंतु दुर्बोध कविता लिहिणारे अनेक कवी असताना ते याच संग्रहाची समीक्षणासाठी का निवड करतात ; याचा उलगडा होत नाही . या विभागात भिन्न प्रकृतीच्या महत्त्वाच्या अशा कविकवयित्रींच्या काव्यसंग्रहांची परीक्षणे समाविष्ट झाली असती तर त्यातून पाटणकरांच्या समीक्षादृष्टीचे अनेक पैलू व्यक्त झाले असते ; असे वाटत राहते .

अशा काही मर्यादा जाणवल्या तरीही या पुस्तकाचे महत्त्व मनावर ठसतेच . काव्यविषयक सर्वच प्रश्नांची ठाम उत्तरे नसतात ; हे जाणण्याचा लवचिकपणा जसा यात आढळतो तसाच आवश्यक तेथे प्रतिपादनाचा ठामपणाही आढळतो . सखोल

अभ्यास, विवेचनाची नेटकी शिस्त, समतोल दृष्टिकोन आणि मुख्य म्हणजे पाटणकरांचे संवेदनाशील कविमन यांमुळे यातील लेखन वाचकांना मर्मदृष्टी देणारे ठरते.

(कविता : संकल्पना, निर्मिती आणि समीक्षा: वसंत पाटणकर, मराठी विभाग, मुबई विद्यापीठ आणि अनुभव प्रकाशन, मुंबई, १९९५, पृष्ठे १८६, नव्वद रुपये.)

( डॉ. नीलिमा गुंडी, ३ अन्नपूर्णा,
१२५९ शुक्रवार पेठ, सुभाषनगर, पुणे - २)

०००

---

## स्वागत

★ **महाराष्ट्रातील भटका समाज :** संस्कृती व साहित्य : डॉ. नागनाथ धों. कदम प्रतिमा प्रकाशन, पुणे, पृष्ठे २३३, एकशे दहा रुपये.

★ **मराठी कथेची स्थिती गती :** डॉ. अंजली सोमण, प्रतिमा प्रकाशन, पृष्ठे २९४, एकशेचाळीस रुपये.

★ **व्रात्य स्तोम :** के. ज. पुरोहित, प्रतिमा प्रकाशन, पृष्ठे २३४, शंभर रुपये.

★ आपला सूर्यतारा : सुधाकर भालेराव, धारा प्रकाशन, औरंगाबाद, पृष्ठे २८, पंधरा रुपये.

★ **व्यक्तिमत्त्व विकासाची आधुनिक ज्ञानेश्वरी :** प्रा. जयप्रकाश बागडे, साकेत प्रकाशन, औरंगाबाद, पृष्ठे ९६, पंचेचाळीस रुपये.

★ **पक्ष्यांची दुनिया :** रमेश महाले, साकेत प्रकाशन, औरंगाबाद, पृष्ठे ३९, वीस रुपये.

★ **किमया विज्ञानाची :** सुधाकर भालेराव, साकेत प्रकाशन, औरंगाबाद, पृष्ठे १३२, पंचाहत्तर रुपये.

★ **वऱ्याच दिवसानंतर आणि इतर एकांकिका :** सुनील मायी, साकेत प्रकाशन, औरंगाबाद, पृष्ठे ४० वीस रुपये.

★ **गोष्ट एका चपलेची :** वावा मांड, साकेत प्रकाशन, औरंगाबाद, पृष्ठे ३६, सोळा रुपये.

★ **मोगरा फुलला :** वसंत वि. जोशी, कौशिक प्रकाशन, सातारा, पृष्ठे ६४, तीस रुपये.

★ **कृष्ण किनारा :** अरुणा ढेरे, सुरेश एजन्सी, पुणे. पृष्ठे १०४, साठ रुपये.
इंग्रजी कसे शिकवावे : डॉ. रा. सो. सराफ, सुरेश एजन्सी, पुणे. पृष्ठे १६८, शंभर रुपये.

★ शब्द लहरी : गजानन घारपुरे, सुरभी प्रकाशन, पुणे. पृष्ठे ३६, पन्नास रुपये.

★ **पखाल :** बावाराव मुसळे, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे. पृष्ठे १६८, शंभर रुपये.

# संशोधन-संपादनाचा एक आदर्श नमुना

डॉ. सु. म. तडकोड

प्रा . अनंत काकबा प्रियोळकर (१८९५-१९७३) यांनी जेजुईत मराठी वाङ्मयाचे संशोधन व संपादन केले; 'फादर सिमांव गॉमिशकृत सर्वेश्वराचा ज्ञानेपदेश' या हस्तलिखिताचे प्रकाशन १९९५ साली झाले . ते त्यांचे शेवटचे संपादनकार्य ठरते . सदर संपादन कार्यास परिपूर्णता आणण्यासाठी त्यांचे शिष्य डॉ . वि . बा . प्रभुदेसाई यांनी स्पष्टीकरणात्मक टिपा, निवडक शब्दसूची व संपादकीय यांची जोड दिली आहे. मध्ययुगीन गोमंतकीय मराठी वाङ्मयाच्या इतिहासाच्या आकलनाला उपयुक्त ठरावा असा हा ग्रंथ आहे .

रोम (इटली) येथील जेजुइत धर्मप्रचारकांच्या कार्याचे संशोधन करणारे फादर जोजफ विकी यांनी प्रा . प्रियोळकर यांना फादर सिमांव गॉमिश याच्या जीवनकार्याच्या संदर्भात खालील माहिती पाठविली होती :

- सिमांव गॉमिश (१६४७-१७२२) चा जन्म व्हेर्मेल्य (पोर्तुगाल) येथे झाला व तो रायतूर (गोवे) येथे ख्रिस्तवासी झाला . १७०९ साली 'देशू' (म्हणजे घाटमाथा) येथे ख्रिस्ती धर्मकेंद्राची स्थापना केली होती . सासष्टी (गोवे) येथील प्रमुख धर्मोपदेशक म्हणून कार्य करीत असता त्याने तत्कालीन स्थानिक भाषेत प्रावीण्य मिळविले होते .

'सर्वेश्वराचा ग्नान उपदेश' ह्या ग्रंथाच्या हस्तलिखितात ३५२ पृष्ठे असून केवळ 'ग्नानोपदेश' ची २८३ पृष्ठे आहेत. इतर पृष्ठांत मराठी भाषेतील ख्रिस्ती धर्मतत्त्वांच्या संदर्भातील प्रश्नोत्तरी, धर्मविधीचे मंत्र व काही स्तोत्रे आहेत. सदर 'ग्नानोपदेश'चे वाचन केल्याने 'अग्नान टाकून मोक्षास वाट दाखवील' अशी आत्मविश्वासपूर्वक ग्वाही ग्रंथकर्त्याने दिली आहे . "ह्या अखंडीत आत्म्याच्या नष्टाला आदी मुळ कोणते म्हणुन पुसलें तर जे माणुसास लागतें सत्यवंत देवाचें अग्नान ॥ या नष्टाला आदीमुळे म्हणून सांगावें ॥ छ॥ ह्याबद्दल सदां काळ सर्वेश्वराहुजीर माणुसाचा आत्मा सर्व सुखे भोगायाला ॥ ग्नान उपदेश ॥ अग्नान टाकुन ॥ मोक्षास वाट दाखवील ॥

सदर ग्रंथ एकंदर सहा भागांत असून प्रत्येक भागाचा आटोपशीर निर्देश फादर गॉमिशने केला आहे .

"ग्नान उपदेश अग्नान टाकून मोक्षास वाट दाखवील॥ अवघा उपदेश साहा



अनुक्रमणिका

भागांमध्ये संपादीन ॥ छ ॥ १ पहीला भाग सत्यवंत देव आहे कीं नाहीं म्हणून त्यां कोण वस्त म्हणून दाखवील ॥ छ ॥ २ दुसरा भाग सत्यवंत देवाचीया करणीया शीकवील ॥ छ ॥ ३ तीसरा भाग सत्यवंत देवाच्या माणुस अवताराचे उत्म (उत्तम) वर्तमान खरे करील ॥ ४ । . चौता भाग स्वामी माणुस अवतार करून माणुसपणी कष्टवल्या अपदा कस्ट आणीक मरण सांगल ॥ छ ॥ ५ पांचवा भाग स्वामी मेल्या उपर तीसऱ्या दिवशी दुसऱ्यान जीवंत झाले म्हणून संतोष वर्तमान सांगून त्यात पापनीवारण शीकवील ॥ छ ॥ ६ सहावा भाग मणसुर्भा (शेवटचा निवाडा) काळ संसार सरे परियंत (पर्यंत) वर्तमान सांगून दाखवील ॥ ''

प्रतिपाद्य विषय येशू ख्रिस्ताची 'तारक' अशी प्रतिमा 'ठसवण्याशी संबंधित असला तरी ख्रिस्ती धर्माचे महत्त्व सांगून प्रसंगी हिंदूधर्म व त्यातील देवदेवतांचे खंडन (कैकप्रसंगी हननदेखील) केलेले आहे. उदाहरणार्थ,

"कृष्णाला रुक्मिणी होती ॥ अणीक सत्यभामी ॥ विष्णुला लक्षुमी । . अणीक तुळसी ॥ ईश्वराला पार्वती ॥ गंगा अणीक लक्षुमी ॥ रामाला सीता । ब्रम्ह्याला अपुली लेकी सरस्वती ॥ ईतुकीया आस्त्रीया ना पुरे होऊन ॥ कृष्णाला सोळा हजार १६००० आस्त्रीया अवनीतीन अपल्या जवळ ठेउन काम सोसी नास्ता समस्तांजवळ आंगभोग दिले ॥ " (आठवें तेज ॥ 'ब्रम्हा ॥ विष्णू ॥ ईश्वराची कार्ये दाखविते ॥ .

पुनर्जन्म खोटा असल्याचे फादर गॉमिशने सांगितले आहे. हिंदू देवदेवतांच्या अनेक रूपांमुळे त्यांना सत्यवंत देवाची लक्षणे लागू होत नाहीत. खऱ्या देवाची सहा लक्षणे असतात. त्या लक्षणांप्रमाणे ब्रह्मा, विष्णू व ईश्वर (महेश) हे देव ठरू शकत नाहीत.

'सर्वेश्वराचा ग्नानोपदेश मधील सर्वच भागांना फादर गॉमिशने 'तेज' असे संबोधले आहे. ह्या संदर्भात डॉ. प्रभुदेसाई यांनी कुतूहल व्यक्त केल्याने 'सुवार्ता' (वसई) या नियतकालिकाचे संपादक फादर फ्रान्सिस दिब्रिटो यांनी त्यांना कळवले की "तेज या शब्दाची व्युत्पत्ती शोधण्याचा प्रयत्न केला. ट्रेसी असा एक शब्द आहे. त्याचे भाषांतर फादर एफ. आर. बुल्के यांनी 'पूर्वान्हिका' असे केले आहे. सकाळ, दुपार, मध्यदुपार, संध्याकाळ, रात्र अशा वेळेला मठात विशेष प्रार्थना केल्या जातात. ट्रेसी ही पूर्वान्हिकेची वेळ त्यावरून 'तेज' शब्द आलेला असावा काय? 'सर्वेश्वराचा ग्न्यान उपदेश' बहुधा लॅटिनवरून घेतलेला असावा. मूळ लॅटिन ग्रंथाचे नाव मला माहीत नाही."

आचार्य विनोबाजींनी 'गीताई' चे लेखन करताना पूर्वान्हिकेच्या संदर्भात आश्रमातील यज्ञ, दान, तप व इतर सेवाकार्यास 'कार्य - क्रम - योग' अशी संज्ञा दिली होती याचे येथे स्मरण होते.

सदर पुस्तकाचे महत्त्व केवळ ख्रिस्ती मराठी वाङ्मय म्हणून नसून संशोधन व संपादनाचा एक आदर्श नमुना म्हणूनही आहे. प्रा. प्रियोळकरांनी जेजुइत मराठी वाङ्मयाचे संशोधन धार्मिक दृष्टिकोनातून केलेले नाही; तर भाषा रचना पौराणिक ऐतिहासिक व सामाजिक निर्देश यांवर त्यांचा भर आहे.

१९५०-५१ साली लंडन येथील स्कूल ऑफ ओरिएण्टल स्टडीज या संस्थेच्या

मार्स्डन संग्रहातील काही मराठी ग्रंथांचे सूक्ष्मपट त्यांनी मागविले. त्यात फादर गॉमिशचा हा ग्रंथ होता. पण त्यावर कर्त्याच्या नावाचा, काळाचा किंवा स्थळाची नोंद नव्हती. प्रा. प्रियोळकरांनी फादर सिमांव गॉमिशचा शोध घेतला. थोर इतिहाससंशोधक डॉ. पांडुरंग सखाराम शेडवी पिसुर्लेकर यांनी फादर गॉमिश या पुर्तुगेज पाद्रीने - मराठी भाषेत व देशी लिपीत लिहिलेला ख्रिस्ती धर्मावरील हस्तलिखित - ग्रंथ असल्याचा निर्देश वाचला असल्याचे म्हटले होते, ते तेवढे सूत्र पकडून प्रा. प्रियोळकरांनी फादर गॉमिशचा शोध सुरू केला.

"त्यांचे (डॉ. पिसुर्लेकरांचे) शब्द ऐकिल्याबरोवर मी मायकोफिल्म करून आणविलेल्या उपरनिर्दिष्ट 'सर्वेश्वराचा ज्ञानोपदेश' या ग्रंथाची मला आठवण झाली. तसाच उठून मी पणजीच्या (त्यावेळी गोमंतक पोर्तुगीज अधिसत्तेखाली होता. याचे स्मरण ठेवल्यास प्रा. प्रियोळकरांच्या ह्या परिश्रमाचे स्वरूप अधिक स्पष्ट होऊ शकेल) सरकारी ग्रंथालयात गेलो आणि तेथे असलेल्या 'बिब्लियॉलॅक लुझितात' नावाच्या पोर्तुगीज भाषेतील चरित्रकोशात सिमांव गॉमिश याची माहिती मिळते की काय हे पाहिले; पण त्यात ती मला सापडली नाही. मुंबईला परत आल्यावर सेंट झेवियर कॉलेजातील जेजुइट लोकांच्या चरित्रकोशात हे नाव मिळते की काय हे मी पाहिले. पण येथेही ते सापडले नाही. शेवटी रोम येथील प्रसिद्ध जेजुइट संशोधक फादर जोजफ विकी यांच्याजवळ तिकडील जेजुइट सोसायटीच्या दप्तरात या पाद्रीची माहिती सापडते की काय, अशी विचारणा केली."

फादर गॉमिशच्या भाषाशैलीचा सूक्ष्म दृष्टीने तर्कशुद्ध अभ्यास व विचार करून त्याने फादर थॉमस स्टिफन्स (१५४९-१६१९) च्या रोमन लिपीतील ख्रिस्तपुराणाचे (Discurso Sobre a Vinda De Jesus Christo Nosso Salvador Do Mundo, १६१६, १६४९, १६५४, १९०७, १९५६) देवनागरी लिप्यंतरही केले असावे, अशा निष्कर्षापर्यंत श्री. प्रियोळकर आले होते.

फादर विकीच्या पत्रात त्या संदर्भात आढळलेला 'देशू' हा शब्द हेरून हा 'देशू' म्हणजे घाटावरचा बहुतेक बेळगाव धारवाडकडचा लिंगायतांची आसपास वसती असलेला एक गाव असावा व कुणबी किंवा मराठी लोकांमध्ये तो आपले धर्मप्रचाराचे कार्य करीत असावा आणि १७०९ मध्ये 'देशू' येथे ख्रिस्ती धर्मकेंद्राची स्थापना झाल्यानंतर त्याने दोन-चार वर्षांतच स्थानिक लोकांना धार्मिक पठणास उपयुक्त अशा ह्या ग्रंथाचे लेखन केले असावे, असा निष्कर्ष प्रा. प्रियोळकरांनी काढला.

हा ग्रंथ देवनागरीत का लिहिला गेला असावा याचे निर्देश करीत प्रा. प्रियोळकर लिहितात :

"गोव्यात आधीच बाटवून ख्रिस्ती झालेल्या व रोमन लिपी ठाऊक असलेल्या लोकांकरीता मिशनऱ्यांनी जे ग्रंथ लिहिले ते सगळे रोमन लिपीत आहेत. 'सर्वेश्वराचा ज्ञानोपदेश' हा प्रस्तुत ग्रंथ पोर्तुगीज बाहेरील मराठी लोकांकरीता असल्यामुळे तो देवनागरी लिपीमध्ये लिहावा लागला, हे उघड आहे."

ह्या ग्रंथात लिंगायतांचा संदर्भ आलेला आहे.

" ह्यास नीज क्रिस्तभक्त, म्हणजे जैसे लींग वांदिल्यात ते कोण जातीचे माणूस तर लिंग वांदिल्यावद्दल लिंगवंत म्हणत्यात। "

तसेच म्हणत्यात', 'घेत्यात'. 'ह्यो', 'त्यो'. 'श्यारास', (शहरास). 'लै' (पुष्कळ) 'म्होरं' (पुढे - समोर) अशी घाटमाथ्यावरील प्रदेशात आढळणारी भापारूपे ह्या पुस्तकात मिळतात. शिवाय 'श्याहण्णव कुळी मराठा' हा शब्द प्रयोग परिचित असला तरी. मराठ्यांच्या शंभर कुळींचा निर्देश फादर गॉमिशने केला आहे.

" आदीपुरुपाला कितुके पुत्र होते ॥ अवघे ते येक पीडीचे ॥ त्या पुत्रास अणीक पुत्र होते ते अवघे दुसऱ्या पीडीचे। . तसेच भूलोक सरेपरियंत्र (पर्यंत) गोत्र अणीक कुळ चिंतावे ॥ येक मरहाटा शंभर कुळ म्हणतात तसेच ॥ "

जेजुइत खिस्ती धर्मोपदेशकांनी ग्रांथिक मराठीचा अभ्यास केला होता पाश्चात्य भापांतील धार्मिक संज्ञांना मराठी परिभाषा देणे त्यांना आवश्यक वाटले असावे. परभाषांतील धार्मिक संज्ञांना अशा परिभाषांचा शोध घेण्यास सहाय्य व्हावे अशी मार्गदर्शक दिशा प्रा. प्रियोळकरांनी दाखवून दिली आहे. शिवाय असे अनेक पारिभाषिक शब्द नोंदून ठेवले आहेत, उदाहरणादाखल ' सत्यक्रुपावेदात' वा 'आपल्या वेदात' (वायवलात) 'ग्यानस्नान' (वॅरिझम), 'शिलुल्यावर', (क्रूसावर) 'पापसंकीर्तन' (कन्फेशन), ' 'दयाळजी', (जोआकिम), 'क्रुपाजी' (जॉन), 'आदिकोजी' किंवा 'आदिकनाथ' (जोजफ), 'रायाजी' किंवा रायनाथ' (पीटर), 'पाउलनाथ' (पॉल), 'स्णावग क्रुपाजी' (जॉन वाप्टिस्ट) 'येजुनाथ स्वामी' (येशू ख्रिस्त)

याच परिभाषांच्या संदर्भात अलाहाबाद येथील कॅथलिक धर्मप्रचारकांनी अशा ख्रिस्ती नावांची भारतीय रूपे वनविली आहेत, याकडे प्रा. प्रियोळकरांनी अभ्यासकांचे लक्ष वेधले. ह्याच दिशेने पुढे जाऊन डॉ. प्रभुदेसाई (पहा - ज्ञानेश्वरीचा ख्रिस्ती पुराणावरील प्रभाव,' ग्रंथ श्रेप्ट ज्ञानदेवी, संपा. ल. रा. नासिरावादकर कोल्हापूर, पृ. २६५) व डॉ. अशोक रा. केळकर (पहा परिभापा सूची', मराठी अभ्यास परिषद पत्रिका, भाषा आणि जीवन. पुणे, वर्ष १२, अंक १. हिवाळा, १९९४ पृप्ठ ५३ ते ६२ यांनीही ख्रिस्तीधर्मविपयक मराठी परिभाषेसंदर्भात विशेष नोंदी केल्या आहेत, त्यामुळे ख्रिस्ती मराठी लेखकांच्या रचनांतून एकार्थता, स्पप्टर्थता, एकरूपता, संघनता, अल्पाक्षरत्व, सातत्य, संगती, शब्दसौष्ठव. अर्थवत्ता यांचा परिचय होतो.

फादर गॉमिशचा हा ग्रंथ विशेप भाषाविषयक अभ्यास तसेच महाराष्ट्राचा सामाजिक इतिहास याद्दष्टीनेही अभ्यासनीय आहे. अठराव्या शतकारंभीच्या हिंदू समाजव्यवस्थेचे ख्रिस्ती धर्मप्रचारकांनी जाणून घेतलेले स्वरूप व आपल्याला हवे तसे त्याचे केलेले अर्थांतर जाणून घेण्यासाठी फ्रेंच पाद्री एतियेन - द ला क्रुवाचे पीटर पुराण चे उदाहरण प्रियोळकर देतात. (Padre Etienne de la (roix)(१७५९ - १६४३) ( Discurso Sabre A Vido Do Apostolo Sam Pedro Em Que Se Retuta Os Prin:ipaes Errors do Gentitismo) १६२९) प्रियोळकरांनी अशा हिंदू देव - देवतांच्या निंदानालस्तीकडे दुर्लक्ष केले आहे; हिंदू धर्माचे खंडन करण्याकरीता ज्या ग्रंथांचा आधार घेतला ते ग्रंथ ख्रिस्ती धर्मप्रचारकांनी मुळातून वाचले होते हे त्यांना

महत्त्वाचे वाटते.

फादर सिमांव गॉमिशने हिंदू समाजामध्ये कुळवाडी, धनगर, वाजंत्री, लोहार, सोनार, सुतार ह्या जाती उदिमाप्रमाणे अस्तित्वात आल्या व शरीराचे अवयव वरखाली असले तरी ते समान त्याप्रमाणे समाजातील निरनिराळ्या जाती समान आहेत, असे प्रतिपादन केले याचा प्रा. प्रियोळकर निर्देश करतात. हिंदूंच्या धार्मिक श्रद्धा व समजुती, उपासना, सामाजिक संस्था यांचे योग्य चिकित्सेद्वारे व मूल्यमापनाद्वारे चित्र स्पष्ट व्हावे म्हणून सदर ग्रंथ विशेष उपयुक्त ठरू शकेल हे देखील सुचवून ठेवले आहे.

'सर्वेश्वराचा ज्ञानोपदेश'ची संहिता वाई येथील 'नवभारत' मासिकातून १९७२-७३ साली क्रमशः प्रसिद्ध होत असतानाच प्रा. प्रियोळकर कालवश झाले. स्वतःच्या प्रकृतीच्या गंभीर स्वरूपाची जाणीव असल्याने प्रा. प्रियोळकरांनी डॉ. प्रभुदेसाई यांना दि. १२।१०।१९७२ रोजी पत्र लिहून, अत्यावश्यक तेवढ्या स्पष्टीकरणात्मक टिपा, निवडक शब्दसूची व संपादकीय यांची जोड देऊन प्रस्तुत गद्यरचना ग्रंथरूपाने प्रसिद्ध व्हावी अशी इच्छा व्यक्त केली होती.

प्रा. प्रियोळकरांच्या मार्गदर्शनानुसार 'सतराव्या शतकातील गोमंतकी बोली' ह्या ग्रंथाचे (१९६३) लेखन करणाऱ्या डॉ. प्रभुदेसाई यांनी 'सर्वेश्वराचा ज्ञानोपदेश'चे 'ना मूलं लिख्यते किंचित्' ह्या न्यायानुसार अध्ययन केले, प्रत्येक शब्दाचा पाठपुरावा केला, अर्थ शोधला. तत्कालीन गोमंतकी बोलीचा प्रभाव काही प्रमाणात फादर गॉमिशच्या ह्या ग्रंथावर आहे; तेही प्रचलित शब्दप्रयोगाची नोंद करून अभ्यासकांच्या निदर्शनास आणले आहे. उदाहरणादाखल 'पाप वकसणे' (पाप भग सुत्रे पापाची क्षमा करणे) 'तात', 'मेजुन', 'जस्यात', 'सदा आकुवारी' (कुमारी), 'गुन्यांव वकसणे' (अपराधास क्षमा करणे) हे वैशिष्ट्यपूर्ण लकबांनी युक्त असलेले शब्द घेता येतील. फादर गॉमिशच्या ह्या ग्रंथाची वैशिष्ट्ये - मांडणी व त्यातील प्रतिपाद्य विषय तपशीलवार सांगून सदर ग्रंथाचे स्वरूप स्पष्ट केले आहे. ह्या ग्रंथातील काशी, रामेश्वर, तेलंगा, कानडा, कोंकण, मल्या, व भारतातील इतर तीर्थक्षेत्रांचे व भूप्रदेशांचे जे निर्देश आहेत त्या संदर्भात डॉ. प्रभुदेसाईंनी 'काही स्पष्टीकरणात्मक टिपा' दिल्या आहेत.

प्रा. प्रियोळकारांनी केलेल्या जेजुइत मिशनऱ्यांच्या मराठी वाङ्मयाच्या संपादनाची वैशिष्ट्येही सांगून प्रा. प्रियोळकरांच्याच शब्दांत जेजुइत वाङ्मयाच्या संशोधनाचा परिचय करून दिला आहे. सतराव्या शतकातील गोव्यात लिहिल्या गेलेल्या वाङ्मयाचे महत्त्व ध्यानात येते. प्रा. प्रियोळकर म्हणतात:

"महानुभावांचे 'लीळाचरित्र' वगैरे गद्यपद्यग्रंथ मराठी भाषेचे जुने स्वरूप कळण्यास ज्याप्रमाणे उपयोगी पडतात त्याप्रमाणे गोमंतकी बोलीतले ग्रंथही मराठी भाषेच्या इतिहासाच्या दृष्टीने उपयोगी आहेत. हे ग्रंथ सतराव्या शतकातील आहेत. महानुभाव ग्रंथ त्याच्याही आधी लिहिलेले आहेत हे खरे परंतु भाषेची अधिक जुनी रूपे महानुभावांच्या ग्रंथांच्या भाषेपेक्षाही गोमंतकी बोलीत आढळतात. सतराव्या किंवा त्यापूर्वीच्या शतकातील कोणताही मराठी ग्रंथ निःसंशयपणे कवीच्या हातचा म्हणता येईल; असा

आज उपलब्ध नाही. आपल्यापुढे असलेला ह्या सर्व ग्रंथांची भाषा पुढील लेखकांनी प्रतिलेख क रताना जाणत किंवा नेणत केलेल्या बदलांमुळे मूळ स्वरूपात राहिलेली नाही, परंतु सतराव्या हा ग्रंथ पाहता अठराव्याही शतकातील ख्रिस्ती मराठी ग्रंथ स्वतः मुद्रित झालेले असल्यामुळे स्वतः कवीने स्वहस्ते लिहिलेल्या ग्रंथाप्रमाणेच त्यांना महत्त्व आहे, हा या वाङ्मयाचा एक विशेष म्हणता येईल."

प्रा. प्रियोळकरांच्या जन्मशताब्दीनिमित्ताने गोमंतक मराठी अकादमीने प्रकाशित केलेला हा ग्रंथ ऐतिहासिक दृष्ट्या महत्त्वाचा ठरतो.

( फादर सिमांव गॉमिशकृत सर्वेश्वराच्या ज्ञानोपदेश : संपादक अ.का. प्रियोळकर, डॉ. वि.वा. प्रभुदेसाई, गोमंतक मराठी अकादमी, पणजी, गोवा. पन्नास रुपये)

( सु. म. तडकोड,
मराठी विभाग, गोवा विश्वविद्यालय, ताळगांव पठार, गोवा - ४०३२०५)

०००

## नवीन आजीव सभासद

### धुळे

प्रा. सी. आय. मोरे
निंवाजी माणिकराव निकम
प्रा. सौ. एस. पी. शिंदे
राहुल प्रभाकर कुलकर्णी
सौ. सविता केशव वहाळकर
रार्जेद्र जगताप
सुहासिनी नारायण पाटील
धनसिंग धोंडू पाटील
प्रा. एम. डी. उदावंत
प्रा. सौ. सुवर्णा त्र्यंबक शिंदे
प्रा. चुडामण नवल पगारे
प्रा. सौ. पुष्पा गावीत
रामराव श्रीधर पाटील
पापालाल उत्तम पवार
एच. एस. माळी
प्रा. सौ. वीणा अहिरे
सुभाष वामन अहिरे
प्रा. जि. व्यं. राहिराव
विष्णुकुमार गुलाबराव जाधव
मधुकर मुकुंद पवार
अनिल सदाशिव पाटील
ओमप्रकाश वासुदेव होळीकर
प्रा. मालती कदम
दीपक द. पाटील
के. एस. पाटील
भगवान रंगा अहिरे

### डोंबिवली

सौ. शुभदा नंदकुमार कुलकर्णी
एच. एम. भट
सौ. सुवर्णा जगदीश दाढकर
प्रकाश दामोदर पाटील
प्रवीण कल्याण मुश्रीफ
शाम गोपीनाथ फडणीस
नरेंद्र मनोहर पटवर्धन
राकेश बाळू रसाळ
शिरीष मुकुंद देशपांडे

# साडेपाचशे ग्रंथांतील संत विचाराचे सार

## डॉ. उषा मा. देशमुख

संतसाहित्य, भाषाविज्ञान, मराठी नाटक आणि सूची हे पुणे विद्यापीठाचे माजी मराठी विभाग प्रमुख डॉ. मु. श्री. कानडे यांचे जिव्हाळ्याचे विषय आहेत. निवृत्तीनंतरही त्यांच्या एकापाठोपाठ एक प्रसिद्ध होणाऱ्या ग्रंथांवरून त्यांच्या संपादन - संशोधन कार्यात खंड पडलेला नाही हे लक्षात येते.

गेल्या चाळीस पन्नास वर्षाच्या व्यासंगाचे आणि संतसाहित्याच्या अभ्यासाचे फलित म्हणून संतसाहित्य-संदर्भ कोशाकडे बघावे लागेल. संतसाहित्य समुद्रासारखे सखोल, हिमालयसारखे उत्तुंग आणि क्षितिजासारखे अमर्याद आहे. म्हणून त्यांनी आपल्या संशोधनाला एक चौकट घालून १८४५ पासून १९९४ पर्यंत प्रसिद्ध झालेल्या संतसाहित्यविषयक ग्रंथांतील वैचारिक लेखनाचा संदर्भकोश सिद्ध केला आहे. संतसाहित्यावरील ललित लेखन, नियतकालिकातील लेखन, हस्तलिखिंत, शिलाप्रेसमुद्रित पोथ्या, मराठी संतसाहित्याचा राष्ट्रीय पातळीवरील तौलनिक अभ्यास, विद्यापीठीय प्रबंध, आकार ग्रंथाच्या आवृत्यांचे इतिहास इत्यादि संदर्भसाहित्याचा उपयोग करता येईल. परंतु संतसाहित्य:वैचारिक ग्रंथ संदर्भ कोश" या स्वरूपाचा हा ग्रंथ आहे आणि हे कामही किती जटिल आहे याची जाणारांना कल्पना असेल.

संत आणि त्यांचे साहित्य समग्र-संपूर्ण संतसाहित्य उपलब्ध असलेले एकही ग्रंथालय महाराष्ट्रात किंवा भारतात नाही हो खरोखर दुर्दैवाची गोष्ट म्हणावी लागेल. (मुंबई विद्यापीठ मराठी भाषा आणि साहित्य भवन उभारून अशी सोय करणार आहे.)

डॉ. कानडे यांनी ज्ञानदेव, नामदेव, एकनाथ, तुकाराम आणि समर्थ रामदास हे पाच संत निवडून त्यांच्यावरील वैचारिक ग्रंथामधील संदर्भ व लेखकांची वर्णनात्मक सूची अकारविल्हे दिली आहे. इतर कालीन संतांवरील ग्रंथांचाही विचार केला आहे. एकूण आठ प्रकरणे संकीर्ण आणि ग्रंथसूची ही अखेरची प्रकरणे आहेत. आधारग्रंथ व्यक्तिनामसूची, विषयसूची अशी तीन परिशिष्टे आहेत. पाच संतकवींच्या अकार ग्रंथाच्या एकूण कोणत्या काळात किती आवृत्त्या उपलब्ध झाल्या आणि त्यात काय काय परिवर्तन झाले याचाही विचार होणे गरजेचे आहे.

लेखकाचे नावं, मूळ लेखकाचे शीर्षक, मध्यवर्ती विचार, ग्रंथनाम प्रकाशन, स्थळ आवृत्ती आणि वर्ष दिले आहे.

उदाहरणार्थ. अडावदकर अनंत देवीदास हे लेखकाचे नाव, ज्ञानेश्वरी चे आधुनिक अवतार हे लेखाचे नाव, त्यातील विविध विषय.

**प्रकाशित ग्रंथ "ग्रंथ श्रेष्ठ ज्ञानदेवी" फडके प्रकाशन, कोल्हापूर, प्रथमावृत्ती १९९१.**

पहिल्या ११८ पृष्टांच्या प्रकरणात ज्ञानदेव, ज्ञानदेवी, आणि ज्ञानदेवांचे चरित्रविषयक लेखन विचारार्थ घेतलेले आहे. पण उपलब्ध ग्रंथांचाच विचार फक्त केलेला आहे. डॉ. अडोणी, मा. श्री. अणे, अप्रबुद्ध, डॉ. वि. रा. करंदीकर, डॉ. द. भि. कुलकर्णी (चार शोधनिबंध, श्रोतृसंवाद), डॉ. मा. गो. देशमुख यांच्या "मराठीचे साहित्यशास्त्र-ज्ञानेश्वर ते रामदास" ह्या ग्रंथांचा निर्देश नाही. प्रस्तुत अभिप्रायलेखिकेच्या "मराठी साहित्याचे आदिबंध आणि "ज्ञानेश्वरी :एक शोध"(मार्च १९९०) "संतसाहित्यदर्शन"(१९९४) या ग्रंथांचा विचार केलेला नाही. असे आणखीही ग्रंथ निसटलेले असतील.

दीडशे वर्षातील ग्रंथांचा आणि त्यातील वैचारिक लेखांचा एक महापट उलगडून दाखविण्याचे हे काम अतिशय मौल्यवान असून लेखकसंशोधकांना प्रेरणा देणारे आहे.

इ.स.१८४५ ते १९९५ या काळातील साडेपाचशेवर महत्त्वपूर्ण ग्रंथांची यादी कालानुक्रमे दिली आहे.

"ज्ञानेश्वरी"ची पहिली शिळाछाप पोथी १८४५ साली प्रसिद्ध झाली. नंतर १८७०,१८९०,१८९४,१९००,१९०५,१९०९,१९१२, या वर्षी ती प्रकाशित होत गेली. इतकेच नव्हे तर गुजराती,कानडी,हिंदी,उर्दू,तेलगू या भाषांतूनही तिची भाषांतरे झाली. गद्यपद्यानुवादही झाले. इंग्रजीतून जी रूपांतरे झाली ती प्रामुख्याने ज्ञानेश्वरीची आणि तुकारामगाथेची "ज्ञानेश्वरी", "दासबोध" आणि 'तुकारामगाथा' यांना विशेष प्राधान्य मिळाले. त्यामानाने एकनाथांच्या साहित्याची प्रकाशने थोडी टप्प्याटप्प्याने झालेली दिसून येतात.

१८९२ साली "दि टेनेटस ऑफ तुकाराम" हे पहिले इंग्रजी पुस्तक श्री. नेदेम्या गोरे यांनी सिद्ध केले. "ज्ञानेश्वरी"," अनुभवामृत", "पासष्टी" आणि " अभंगगाथा" यांची इतर संतकवींच्या काव्यापेक्षा अधिक प्रकाशने झालेली आहेत.

१९०३ साली श्री. प्र. रा. भांडारकर यांचे 'टू मास्टर्स, जीझस अँड तुकाराम' असे तौलनिक पुस्तक निघाले. १९०९ मध्ये जे. नेल्सन फ्रेजर यांनी "दि पोएम्स ऑफ तुकाराम" चा हा पहिला भाग छापला व त्यानंतर १९१३ आणि १९१५ साली पुढचे भाग प्रसिद्ध झाले.

वि. का. राजवाडे यांची संपादित "ज्ञानेश्वरी" १९०९ सालची आहे. तसेच विष्णुबुवा जोग यांची तुकारामगाथा दोन भागांची निघाली. १९१४ साली कृ. के. जोशी यांनी Declension of Nouns in Marathi as seen in Dnaneshwari Works या विषयावर पीएच.डी. प्रबंध लिहिला. तो अप्रकाशित आहे. फ्रेजर आणि जे.एफ. एडवर्ड यांनी मिळून "दि लाइफ अँड टीचिंग ऑफ तुकाराम" हा ग्रंथ प्रसिद्ध केला. "तुकाराम-द पोएट सेंट ऑफ महाराष्ट्र" हा जस्टिन अॅबट यांचा ग्रंथ १९३०

साली प्रसिद्ध झाला. "साम्स ऑफ मराठी सेंट्स" हा डॉ. निकोल मॅकनिकल यांचा ग्रंथ १९२९ सालचा आहे. 'मिस्टिसिझम इन महाराष्ट्र(१९३३) या रा. द. रानडे यांच्या ग्रंथापूर्वी संतसाहित्याची भाषांतरे रूपांतरे झाली होती ही कुतूहल-जनक माहिती आपल्याला मिळते. "मिस्टिसिझम इन महाराष्ट्र" मधील समर्थविषयक विवेचनांचा अनुवाद 'श्रीसमर्थ रामदास, चरित्र व तत्त्वविवेचन' या नावाने श्री. कृ. वें. गजेंद्रगडकर यांनी १९५३ साली केला. १९५४ साली रा. के. भागवत यांनी संपूर्ण ज्ञानेश्वरीचे इंग्रजीत भाषांतर केले. १९५६ मध्ये "द फिलॉसफी ऑफ ज्ञानदेव" हा भा. पं. बहिरट यांचा तर १९६० साली "द कल्ट ऑफ विठोबा" हा फादर डलरी यांचा ग्रंथ प्रसिद्ध झाला. त्याच वर्षी आय्. एम्. पी. रेसाइड यांची "द बिब्लिऑग्राफिकल इन्डेक्स ऑफ महानुभाव वर्क्स" ही सूची प्रसिद्ध झाली.

पुरवणी सूचीत कानडे यांनी भारतातील विविध विद्यापीठांतील अप्रकाशित पीएच.डी. ग्रंथांची सूची दिली आहे. तीही महत्त्वाची आहे. ग्रंथांच्या अखेरीस लेखसूचीसाठी वापरलेले आधारग्रंथ आणि संदर्भग्रंथ यांची सूची आहे. व्यक्तिनामसूची बरोबरच संत साहित्य संशोधन-विषयसूची दिली आहे. काव्यातील विविध विषयांची सूची ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ, तुकाराम, रामदास या कवींच्या अनुक्रमाने घेतली असून, तौलनिक विचार, अन्य संतकवी कवयित्री आणि संकीर्ण या पद्धतीने अभ्यास सादर केला आहे.

संतसाहित्याची अभ्यासक म्हणून त्यांचे अभिनंदन करते.

कोणत्याही संशोधनाचा आरंभ सूची कार्यापासून होतो. सूचीमुळे विषयाची सखोलता आणि व्यापकता, सूक्ष्मता आणि विकसनशीलता लक्षात येते. शोधविषयक वाटा दिसू लागतात. संशोधनाचा दिशादर्शक एक नकाशाही पुढे उलगतो. अशा अभ्यासपूर्ण सूची पदवीसाठी संशोधन म्हणून मान्य व्हायला हव्यात. आधुनिक मराठी साहित्याच्याही या प्रकारच्या विभागशः सूची सिद्ध होण्याची गरज आहे.

हा संदर्भकोश प्रकाशित केल्याबद्दल स्नेहवर्धन प्रकाशनाच्या डॉ. प्रा. स्नेहल तावरे यांचे अभिनंदन केले पाहिजे. कारण सूचिग्रंथ प्रकाशित करण्याचे धाडस दाखविणारे प्रकाशक विरळा आहेत.

**(संतसाहित्य - संदर्भ कोश,** खंड - १, संकलक डॉ. मु. श्री. रानडे, स्नेहवर्धन प्रकाशन, पुणे३० पृष्ठे ४८५, अर्डीचशे रुपये)

(डॉ. उषा देशमुख, साहित्य सहवास, वांद्रा पूर्व, मुंबई - ५१)

०००



अनुक्रमणिका






# दळवींचे व्यक्तिमत्त्व आणि साहित्य

म. मो. केळकर

जयवंत दळवी हे मराठीतले प्रथितयश, समर्थ पण क्वचित वादग्रस्त ठरलेले लेखक. कथा, कादंबरी व नाटक हे तीनही प्रांत त्यांनी गाजवले. मुळात त्यांचा स्वभाव अबोल, जास्त न मिसळण्याचा, एकांताची आवड असलेला. भिडस्तपणामुळे ते येणाऱ्याला कटवूही शकत नसत. अशा दळवींना लेखिकेने बोलते केले, मनमोकळी मुलाखत मिळवली हे या लेखिकेचे मोठेच यश होय.

दळवींचे व्यक्तिमत्त्व जाणून घेणे हा लेखिकेचा मूळ हेतू आहे. दळवी - व्यक्ती व वाङ्मय ( खरे तर पुस्तकाला हे शीर्षक योग्य झाले असते ) जाणून घेताना त्यांनी ते दैनंदिनीच्या स्वरूपात मांडले आहे. मुलाखतीतील दळवींची वक्तव्ये उद्‌धृत केल्याने विवेचनाला अधिकृतपणा व वजन आले आहे. हा आकृतिबंध छान आहे.

दळवींचे व्यक्तिमत्त्व उलगडून दाखवताना लेखिकेने त्यांच्या सर्वच साहित्याचा परामर्श घेतला आहे. त्यामुळे दळवी अजिवात न वाचलेल्या माणसालाही दळवींचे वाङ्मय व व्यक्तित्व यांचे आकलन होऊ शकते.

दळवींच्या साहित्याच्या बाबतीत दान गोष्टी महत्त्वाच्या आहेत. एक तर त्यांच्या साऱ्या वाङ्मयाची पार्श्वभूमी कोकणची आहे व दुसरे असे की बहुतेक लेखनात लैंगिक संबंध व त्यातून निर्माण झालेले दुःख आढळते. कोकणच्या पार्श्वभूमीबद्दल लेखिका म्हणते की हे कोकणचे प्रातिनिधिक चित्र नाही (६६). पण ते प्रातिनिधिक आहे असा दळवींचाही दावा नाही. त्यांना जे अनुभवाला आले ते त्यांनी वर्णन केले.

लैंगिक वैफल्य हा विषय दळवींनी मांडला. प्रेम हे मूलतः शारीरिक आहे असे त्यांचे मत आहे (८७). त्यासाठी जी. ए. कुलकर्णी, भालचंद्र नेमाडे यानी दळवींवर टीका केली आहे. अत्र्यांनी कमला फडके यांच्यां लिखाणाला 'लिंङमय' असे म्हटले होते. तसाच हा प्रकार. मौज म्हणजे शरीरसुखाचे प्रेमातले महत्त्व लेखिकेनेही मान्य केले आहे.'शुद्ध मैत्रीत शारीरिक आकर्षण नसतेच असे म्हणणे ही फसवणूक असते(१७६).' याबाबतचे दळवींचे विचार धक्का देणारे आहेत हे खरेच.कोण कुणाशी रत होतो याला महत्त्व राहणार नाही (१००).' यावरील लेखिकेची प्रतिक्रिया 'लैंगिक स्वातंत्र्याच्या कल्पनेने त्यांची पात्रे स्वैरतेकडे झुकणारी दिसतात.' (१००) ही बरोबर आहे.

लग्न हे दु:खाचे मूळ असावे का हा प्रश्न 'लग्न' नाटकाने उभा केला आहे. लग्न म्हणजे बंधने येतात आणि मग मुखवटे घालून वागता येत नाही.(१००)

स्त्रीपुरुष शारीरिक संबंधाची उत्तेजक वर्णने ते करतात, पण त्यातही संकोच असतो. लेखनिकाला 'हे तोंडाने सांगणे अवघड आहे' असेही ते म्हणतात(९७). अशा वर्णनाचा लेखकावर होणारा शारीरिक मानसिक परिणाम त्यांनीच वर्णन केला आहे(९१). या संदर्भात लेखिकेने मांडलेली Sexual Fantasy ची उपपत्ती फारशी योग्य वाटत नाही. याची सांगड परत लहान वयातल्या वैफल्याशी जुळलेली दिसते(११६). लहानपणी असले वैफल्य दळवीना आल्याचा कुठे उल्लेख नाही. लहानपणी जे भयानक त्यांनी पाहिलं ते सांगितलं. वाईच्या स्तनातले दूध पिऊ पाहणारा म्हातारा, खाटेखाली भाऊ झोपला असताना खाटेवर धंदा करणारी बहीण(७७), संपूर्ण विवस्त्र स्त्री वा पुरुष हे जे दळवींनी पाहिले ते भयानक होते. ते पाहून जीवनात बीभत्स विकृती यावी, पण दळवींच्या बाबतीत साहित्यानेच निचरा केला.

दळवींच्या साहित्याचा आढावा लेखिकेने घेतला आहे. 'चक्र' कादंबरी लेखिकेला अयशस्वी वाटते. जे वातावरण पूर्वी कधी मराठी वाङमयात आले नाही ते या कादंबरीत आले हेच या कादंबरीचे यश! 'बेन्वा' किंवा 'लुका' यांच्यातला बदल लेखिकेला पटत नाही. पण माणसाचा स्वभाव अर्तक्य आहे! 'दुर्गा' च्या बाबतीतही लेखिका समाधानी नाही. 'हे संवाद बाबुराव दुर्गा यांच्या उत्कट प्रेमाचा आविष्कार वाटत नाहीत'(१६२). या साऱ्याला लेखिका 'चाळे' म्हणते. ती दोघे वय विसरली यातच सारे आले. लेखिकेला ही शोकांतिका हवी आहे. दळवींच्या साऱ्या नायकांच्या शोकांतिका आहेतच की!

अनेक ठिकाणी लेखिकेला विसंगती वाटते. 'दळवींच्या साऱ्या स्त्रियाच वेड्या होतात, पुरुष नाही' हा स्त्रीच्या मूलभूत स्वभावाचा भाग आहे. 'पर्याय' कादंबरी सोडली तर इतरत्र स्त्रिया स्त्रियांना समजावून घेतात हे चित्र लेखिकेला शंकास्पद वाटते. पण अपवाद असूच नयेत का? मुलगा युद्धावर गेला असता इकडे गरोदर राहिलेल्या सुनेला समजून घेणारी मोलकरीण मी पाहिली आहे. तेव्हा नानांनीही त्याला समजून घेतले पाहिजे हे लेखिकेचे म्हणणे योग्य आहे. दुसऱ्या बाजूचा विचार न करणे हे दु:खाचे कारण आहे.

दळवींच्या व्यक्तित्वातल्या दोन विसंगती लेखिकेने वर्णन केल्या आहेत. पहिली पत्नी टाकून दुसरे लग्न करणाऱ्या आनंद साधले यांच्या दुसऱ्या विवाहात दळवींनी रस घेणे हे अन्यायाच्या बळी ठरलेल्या स्त्रियांचे वर्णन करणाऱ्या दळवींच्या बाबतीत चमत्कारिक वाटते. दुसरा प्रसंग सरकारी प्लॉट घेण्याचा. पहिल्यातील प्रकरण नाजुकच, अशा प्रकरणात सारे सत्य बाहेर येतेच असे नाही. सात अष्टमांश भाग अदृश्यच असतो. तसेच कारण असल्याखेरीज दळवी त्यात पडले नसते. दुसऱ्या प्रसंगात ते कन्येसाठी काही तजवीज करू पाहत होते असा लेखिकाच उल्लेख करते. कौटुंबिक बाबी फार नाजुक असतात. बाहेरच्यांनी मत न देणे बरे.

'ठणठणपाळ'चा विचार केल्याखेरीज वाङ्मयीन आढावा पुरा होणे शक्य नाही. त्याने इतिहास घडवला हे खरेच. मिष्किल लेखनाचे ते उत्तम उदाहरण आहे. पण कधी

कधी विनोद वैयक्तिक झाल्याने फडके, गाडगीळ, घाटे, बाबुराव चित्रे ही मंडळी दुखावली गेली. एरवी सौम्य वाटणाऱ्या व वागणाऱ्या दळवींचे हे बोचकारे झोंबणारे होते. ' त्यांच्या सुप्त रागलोभांना हा बुरखा मिळाला ' (२९७) हे लेखिकेचे मत फारसे चूक नाही.

व्यक्ती म्हणून दळवी एक भला माणूस होते हे सर्वांचेच मत आहे. उदार हस्ताने ते मदत करीत असत. त्यांच्या चारित्र्याबद्दल कोणीही व कधीही शंका घेतली नाही. अमेरिकन मुलगी तर तात्पुरती पत्नी व्हायला तयार झाली होती! दळवींची तत्त्वनिष्ठा वाखाणण्याजोगी. आपण सभासद असलेल्या समितीसमोर आपलीच ' चक्र ' आल्यावर त्यांनी ती वगळली (२८४) ते अत्यंत प्रसिद्धी विन्मुख होते (२१४). त्यांना जवळचे असे कोणी नव्हते. पत्नीशीही ते मोकळेपणाने बोलत नसत (१८६). त्यांनी मुद्दाम कुणाशी वैर केले नाही. पण स्वाभिमानाला धक्का देणाऱ्याची गयही केली नाही. म्हणूनच ते दारव्हेकरांना निर्बुद्ध म्हणाले आणि विजया मेहतांवर टीका करू शकले श. ना. नवरे आणि दळवी यांच्यातला महानंदावरून झालेला वाद खरोखरच दुर्दैवी. असाच थोडासा प्रसंग गडकऱ्यांच्याही बाबतीत झाला.

पिता म्हणून दळवींना अपयश आल्याचे लेखिकेने म्हटले आहे. त्यांचे मुलाशी पटत नसावे हे लेखिकेला आलेल्या मुलाच्या, पत्रावरूनही स्पष्ट जाणवते. आजारपणातही तो मोकळेपणाने बोलत नाही. पण दळवींनीही त्याला बोलावून स्पष्टपणे विचारायला काय हरकत होती? पुन्हा हाही एक कौटुंबिक गुंता!

या ग्रंथातून दिसतात ते दळवी एक सिद्धहस्त लेखक, तत्त्वनिष्ठ, अबोल, तीक्ष्ण विनोदबुद्धी असलेले, दुसऱ्याला आपला त्रास होऊ नये म्हणून अखंड जपणारे, फारसे मित्र नसलेले पण उदारपणे मदत करणारे, लहानपणच्या अनुभवांचा खोल परिणाम झालेले, लैंगिक समस्यांवर भर देणारे असे.

दळवींचे व्यक्तिमत्त्व व साहित्य या दोहोंचा या ग्रंथात विस्तृत, तपशीलवार आढावा घेतलेला आहे. तो चांगला उपयुक्त आहे. महत्त्वाचे म्हणजे पुराव्यादाखल उतारे दिले आहेत. प्रत्येक तपशिलाच्या मुळापर्यंत जाण्याचा लेखिकेचा प्रयत्न आहे. म्हणूनच दळवींबरोबरच त्यांचे स्नेही विरोधक यांच्याशीही लेखिकेने संपर्क साधला आहे. एक अपवाद सोडता सर्वांनीच सहकार्य केले आहे. लेखिकेने घेतलेले कष्ट पानोपानी जाणवतात. समग्र दळवींचा विचार करणारा एक चांगला ग्रंथ असे या पुस्तकाचे वर्णन करता येईल. छायाचित्रांमुळे ग्रंथाला उठाव आला आहे. ज्या माजघराने दळवी घराण्यातील अनेक स्त्रियांचे हुंदके ऐकले त्याचे छायाचित्र असते तर बरे झाले असते.

जाता जाता सहज एक गोष्ट नमूद करायला हरकत नाही ' अपर्णाच्या वर्णनाच्या संदर्भात लेखिकेने व्यक्त केलेला विचार एका सुशिक्षित स्त्रीचा म्हणून स्त्रियांनीच लक्षात घेण्यासारखा. ' स्त्रीने ' करिअरची कल्पना तपासून पाहिली पाहिजे. मूल, नवरा अन् घर सांभाळून ती जे काही मिळवणार आहे ते तितकेच तुल्यबळ आहे का याचा विचार तिने करायलाच हवा ' (१००). लेखिकेचे पुनश्च अभिनंदन!

( जयवंत दळवींविषयी : सरला आठल्येकर, राजहंस प्रकाशन, पुणे पृष्ठे ३००, एकशे ऐंशी रुपये )

(म. सी. केळकर, सुकृत, समर्थ कॉलनी, जळगाव ४२५ ००२)

००

# स्त्रीवादी समीक्षेचे एक प्रात्यक्षिक

## जयश्री पाटणकर

१९७५ नंतरच्या स्त्रीमुक्ती चळवळीने राजकीय, सामाजिक व साहित्यविषयक क्षेत्रावर फार मोठा परिणाम केलेला आहे. साहित्य आणि समीक्षा या दोन्ही क्षेत्रात स्त्रीवादी परिप्रेक्ष्यातून लेखन होत आहे.

उषाताई शिंदे यांचे 'विभावरी शिरुरकरांच्या साहित्याचे स्त्रीवादी आकलन' हे स्त्रीवादी विचारसरणीचेच मूर्त रूप आहे.

प्रारंभी स्त्रीवादी समीक्षेचे स्वरूप व पद्धती सांगून काही निकष दिलेले आहेत. स्त्रीस्वभावातच स्त्रीशक्तीचा साठा शोधणे, स्त्रीविशिष्ट भाषेच्या वापराकडे लक्ष ठेवून अनुभवविश्वाचा शोध घेणे, पितृसत्ताक पद्धतीतील पुरुषी राजकारणाला शह देणाऱ्या विस्मृतीतील लेखिकांचा पुनर्शोध घेणे, पुरुषांचे प्रभुत्व आणि स्त्रियांचा मुकेपणा यांचे स्त्री केंद्री आकलन करणे, स्त्रीच्या अस्मितेचा शोध घेण्यासाठी साहित्यातील संकेत, परंपरा, मूल्यकल्पना यांची पाहणी करणे, निखळ स्त्रीत्वाच्या प्रतिमांचा शोध घेणे, व्यक्तींच्या महसंबंधनिष्ठ आकलनाला स्त्रीकेंद्री दृष्टीची जोड देणे, साहित्याच्या संहितेचे वाचन स्त्रीवाचकाच्या समूह दृष्टीतून करणे ह्या निकषांच्या आधारे विभावरींचे कथा, कादंबरी व नाट्यलेखन तपासले आहे.

विभावरींच्या कथासाहित्याचे स्त्रीवादी आकलन पुढीलप्रमाणे आहे : 'कळ्यांचे निःश्वास' (१९९३), 'दोघांचे विश्व' (१९५७) व इतर असंग्रहित कथा यांच्या अभ्यासातून विभावरींनी पहिल्यांदाच समकालीन रंजनवादी साहित्य परंपरेपेक्षा स्त्रियांच्या प्रश्नांना केंद्रवर्ती ठेवून कथा लेखन केले. पुरुषसत्ताक दृष्टीचा 'पडदा' फाडणारे हे क्रांतदर्शी लेखन आहे. या कथांद्वारे स्त्रियांच्या कृतीमागील विचार -विकारांचा मानसशास्त्रीय दृष्टीतून शोध घेतला आहे. पुरुषसत्ताक संकेतांचे कार्य व स्त्रीप्रश्नांभोवतालचे सामाजिक पर्यावरण निर्देशित केले आहे. स्त्रीपुरुष संबंधात उच्च मैत्रभाव कसा असू शकतो याचेही चित्रण केले आहे. (दोघांचे विश्व). मातृत्वाच्या गौरवात किंवा अधिक्षेपात स्त्रीचे मानले जात असलेले साधनमूल्य डावलून तिच्या 'व्यक्तित्व' मूल्याची जपणूक करणाऱ्या या कथा एकाचवेळी व्यक्तिनिष्ठ व साहचर्यनिष्ठ सामाजिक कथा आहेत.

कादंबरीसारख्या विशाल अनुभवपट असलेल्या वाङमयात स्त्री प्रश्नांच्या विविधतेपेक्षा त्या प्रश्नांमागील मानसिक, सामाजिक कारणांचा तलस्पर्शी शोध घेण्याकडे अधिक लक्ष दिले आहे. स्त्रीचा आत्मसन्मान, तिचे सत्त्व, स्वतंत्रता, स्त्रीत्व, प्रेमभाव यांचा शोध त्या घेतात. 'हिंदोळ्यावर' कादंबरीत, परित्यक्त्या अचलाच्या मातृत्वाच्या नैसर्गिक, जीवशास्त्रीय ओढीवर भर देऊन स्त्रीपुरुषांच्या वैचारिक समानतेच्या सहवासाची गरज

प्रतिपादिली आहे.

'विरलेले स्वप्न' या कादंबरीतील रोहिणी शिक्षणामुळे स्वावलंबी झालेली असली तरी तिचे पुरुषावलंबित्व कमी होत नाही. 'विवाह हा सहजीवनाचा करार आहे' या विचारातील यांत्रिकतेमुळे श्रमविभागणीचे तत्त्व संसारातही अवलंबिले तर 'एखाद्याची मजुरी आवडत नाही म्हणून दाम मोजून तोडून टाकण्याचा' संभाव्य स्त्री शोषणाचा धोका स्पष्ट केला आहे.

'सुशिक्षित दाथका या संसारासाठी नसतातच' असला विचार करणारी पुरुषप्रधान आणि नवऱ्याशिवाय समाजात बाईला कोणी मान देत नाही ही वास्तवता 'शबरी'त स्पष्ट केली आहे.

पुरुषी दांभिकता आणि स्वार्थलोलुपता ही स्त्रीत्वाच्या शोषणाचे कारण बनते. स्त्रीशिक्षण, स्वावलंबनापेक्षा पुरुषांच्या सहिष्णुतेची, वैष्णववृत्तीची गरज आहे हे 'उमा' कादंबरीवरून दिसून येते.

'खरे मास्तर' मध्ये पुरुषांचा स्त्रीकडे पाहण्याचा सहिष्णू दृष्टिकोन व स्त्रीच्या आत्मसन्मानाचे सुंदर चित्र इंदू, कृष्णाबाई व बाळूताई यांच्या रूपाने चितारले आहे.

'पारध' नाटकामधील 'रमे' ची पारध केवळ पुरुषी समाजदृष्टीतून न होता आई, सासू व समाजकार्य करणाऱ्या स्त्रियांकडूनही कशी होते याचे चित्रण आले आहे. बेगडी झगमगाटाच्या मागे लागलेली स्त्री, कृतकजीवनादर्शामुळे स्वतःच स्वतःच्या शोषणाला कारण होते याची परखड मीमांसा 'कलियुग ग बाई कलियुग' मध्ये केली आहे. नवऱ्याच्या ध्येयात सहभागी होऊन स्वातंत्र्य लढ्यात योगदान द्यायला पुढे सरसावलेली नायिका मालतीबाईंनी 'अलौकिक संसार' मध्ये उभी केली आहे.

विभावरींच्या वाङ्मयाचे हे आकलन केवळ 'स्त्रीवादी आकलनच' राहिलेले नसून मूल्यमापनात्मकही झाले आहे. स्त्रीकेंद्री जाणिवांचे लेखन हे मूलगामी वाटते.

(विभावरी शिरुरकर यांचे वाङ्मय - स्त्रीवादी आकलन : ऊषाताई शिंदे, कळवण
पृष्ठे १९६, एकशेवीस रुपये)

(जयश्री पाटणकर, माधुरी, शिखरेवाडी, नाशिकरोड ४२२ १०१)

०००

## नवीन आजीव सदस्य

नीलिमा प्रियदर्शन बंडेलू, अहमदनगर
वृंदा महेश केंगे, लासलगाव
नानासाहेब दत्ताजी पाटील, लासलगाव
शहाजी चंद्रभान पाचोरे, नारायणगाव
प्रा. समिधा चव्हाण, नागपूर
सहदेव मारुती मखामले, तळेगावदाभाडे
डॉ. रविकांत दत्तात्रय जोशी, बडोदा
प्रा. बळवंत नाथा तुरंबेकर, कोल्हापूर
सौ. शालिनी अरविंद कुलकर्णी, पाचोरा
सुरेश भिकाजी जाधव, लासलगाव
गोविंदा सदाशिव वडनेर, लासलगाव
किशोर दिगंबर चौधरी, खिरोदा
बंडू सदाशिव वाणी, पारोळा (जळगाव)
गोपाळ रघुनाथ गुर्जर, पांगारे (रत्नागिरी)
नाना प्रकाश मस्के, उरळीकांचन
दीपक विनायक भागवत, कोल्हापूर
सच्चिदानंद दत्तात्रय मोकाशी, सोलापूर



अनुक्रमणिका

# संशोधनोपयोगी एक नवा उपक्रम

डॉ. व. वि. कुलकर्णी

कुठलेही संशोधन करताना त्या विषयात त्या अगोदर कोठे काय आले आहे हे पाहण्यासाठी सूचींची गरज असते. गौरविका, गौरवग्रंथ, स्मरणिका, संशोधनपर ग्रंथ, प्रबंध, नियतकालिके अशा विविध प्रकारच्या साहित्यात त्या सूची विखुरलेल्या असतात. आपल्या विषयावरील सूची शोधण्याचे काम परिश्रमाचे असते. डॉ. सु.रा. चुनेकर यांची 'सूचींची सूची' त्यामुळे अनेक संशोधकांना उपयुक्त वाटेल. 'मराठी संशोधन पत्रिका (१९६९, १९७१) व महाराष्ट्र साहित्य पत्रिका (१९७८) मध्ये या सूचीचा काही भाग प्रसिद्ध झाला होता. या पुस्तकात एकूण ६७५ बाबींची सूची केली आहे. ही मराठीतील तसेच भारतातील 'सर्वप्रथम' सूचींची सूची म्हणता येईल.

प्रस्तुत सूचीचे दोन विभाग आहेत : (१) लेखक-सूची, (२) विषय-सूची.

यांचे पुन्हा पोटविभाग केले आहेत. 'लेखक-सूची' मध्ये अर्वाचीन लेखक, प्राचीन लेखक, संकलित लेखक-सूची आणि काही इंग्रजी लेखक यांच्या वाङ्मयाची सूची आहे.

विषय-सूची विभागात ग्रंथ, हस्तलिखिते, सूक्ष्मपट, विद्यापीठीय संशोधन, नियतकालिके यांच्या सूची आहेत.

संकीर्ण विभागात वाङ्मयेतिहास, वाङ्मयीन मूल्यमापन, आक्षिप्त वाङ्मय, दलित साहित्य, संशोधन, प्रमुख व्यक्ती, लोकसाहित्य, महिलांचे प्रश्न, महाराष्ट्र, अर्थशास्त्र, शास्त्रीय वाङ्मय, ग्रामसूची, दुर्ग, ग्रंथालये, स्थलसूची, भाषाविषयक लेखन, कोशवाङ्मय, अनुवाद, इतिहास, कालगणना, नाट्य-चित्रपट, या विषयांवरील सूची आहेत. शेवटी परिशिष्टात (१) सूचिविषयक काही संदर्भसाहित्य, (२) माझे सूचिकार्याशी संलग्न काम आणि (३) 'सूचींच्या सूची' विषयींचे अभिप्राय दिले आहेत.

मराठी भाषा व साहित्यविषयक हा एक नवा उपक्रम आहे. एका सूचीत किमान ५० नोंदी आहेत असे मानले तरी ६७५ नोंदीतून तीस हजारावर संदर्भ उपलब्ध होतात. मराठीतील सूचींच्या अत्यंत निपुण व अधिकारी अभ्यासकाने केलेला हा ताळेबंद आहे. मराठीत लेखकसूची, ग्रंथ, नियतकालिक, लेख, हस्तलिखिते, विद्यापीठीय संशोधन, सारसूची, विषयसूची, पदसूची, शब्दसूची, अशा विविध प्रकारच्या सूची झालेल्या असल्या तरी त्या गरजेपेक्षा संख्येने कमीच आहेत. गुणवत्तेच्या व तंत्राच्या दृष्टीनेही या सूचींचा चिकित्सक अभ्यास हा प्रबंध स्तरावरील संशोधनाचा विषय होऊ शकेल. ज्यांनी सूचीचे संकल्प केले आहेत व ज्यांचे कार्य चालू आहे, अशा अनेक संकल्पित सूचींची



अनुक्रमणिका

जंत्री प्रस्तावनेत दिली आहे. ' हा माझा योजनाबद्ध सर्वसमावेशक असा प्रकल्प नाही. यात अपुरेपणा आहे याची मला जाणीव आहे. जे काम झाले आहे ते अपुरे असले, तरी पुरेसे उपयुक्त असेल तर ते प्रकाशित होणे इष्ट आहे' असे डॉ. चुनेकर म्हणतात.

या संकलनात काही त्रुटी जाणवतात. 'संकीर्ण या विभागात दिलेल्या सूची या विषयसूचीच होत. त्यांचा क्रम अकारवारीने असायला हवा होता. शेवटी उल्लेखसूची असायला हवी होती. क्रमरचनेमुळे वा मांडणीमुळे सूची सहज मिळण्यातील अडचणी टळनात. लेखकांच्या नोंदी आद्याक्षरानुसार आहेत. त्या लेखकांच्या सूची पुन्हा संकलित सूचीतही आहेत, त्या त्याच संदर्भात निदर्शनास येऊ शकणार नाहीत. तसेच नोंदक्रमांक ३६४ मध्ये 'मराठी स्वाध्याय संशोधन पत्रिके' च्या विशेषांकात (१) प्रो. चिं.नी.जोशी (२) प्रा.र.म.भुसारी (३) डॉ. ना.गो.नांदापूरकर (४) डॉ.श्री.रं.कुलकर्णी (५) डॉ. व.दा. कुलकर्णी (६) डॉ. माणिकराव धनपलवार (७) श्रीमती मा. सरदेसाई इतक्या लेखकांच्या वाङ्मयसूची आहेत. त्या अभ्यासकाच्या नजरेस कशा येतील? कोशांमध्ये माहितीचा संग्रह असणे व त्यातील कोणतीही माहिती नेमकी मिळणे हे निकष अनिवार्य होत. अनुक्रमणिकेत प्रत्येक नोंदीसमोर पृष्ठांक द्यायला हवे होते.

अशा काही सूचना करतानाही हे काम फार महत्त्वाचे, उपयुक्त व भावी सूचिकारांना वाट दाखविणारे आहे, यात शंका नाही. संकलनकार व प्रकाशक त्याबद्दल धन्यवादास पात्र आहेत.

(सूचींची सूची: मु.रा.चुनेकर, प्रतिमा प्रकाशन, पुणे ३०, पृष्ठे १४२, नव्वद रुपये)

(डॉ. व. वि. कुलकर्णी, व्यासंग, ११ विद्याविहार, प्रतापनगर, नागपूर ४४००२२)

०००

**श्रीकांत सिनकर**

पोलिसी साहसांची व तपास पद्धतीची माहिती कथा-कादंबऱ्यांद्वारे सामान्य लोकांना देणारे लेखक श्रीकांत सिनकर यांचे १० फेब्रुवारी १९९६ रोजी सकाळी जे. जे. रुग्णालयात निधन झाले. ते ५५ वर्षांचे होते. गेली दोन वर्षे त्यांना फुप्फुसांचा विकार होता.

हँगओव्हर, इन्स्पेक्टर जयकर, सवाई ठकसेन शर्मा, आरामनगर पोलिस ठाणे, बोलकी डायरी ही त्यांची पुस्तके बरीच गाजली.

श्री. सिनकर यांनी काही एकांकिकाही लिहिल्या असून, त्यापैकी 'आलिया भोगासी' या एकांकिकेचे एक हजारहून अधिक प्रयोग झाले. आपल्या आजारपणाच्या काळातही श्री. सिनकर यांनी बरेच लिखाण केले आणि त्यांची 'इन्स्पेक्टर अरविंद पटवर्धन', 'हॅलो, विनायक वाकटकर', 'ता. भा. गौड', 'जयकथा', 'हॅलो, सुरेश पेंडसे हिअर' व 'बागवान स्पीकिंग' ही पोलिस अधिकाऱ्यांच्या तपास कार्यावरील पुस्तके प्रकाशनाच्या मार्गावर आहेत.

त्यांना आमची श्रद्धांजली

मी अजून जिवंत आहे : किशोर रणदिवे

# विचार करायला लावणारा सत्‌असतचा संघर्ष

डी. व्ही. कुलकर्णी

कोणत्याही सत्तांध राजवटीत जनसामान्यांची नेमकी भावना काय असेल? सत् आणि असत् यांच्या संघर्षात त्यांना असत् प्रवळ वाटत असेल का? आणि जर असत् प्रवळ असेल तर या लढ्यात सामान्यांचं नेमकं स्थान कोणतं? त्यांच्या मानवी हक्कांचं काय? या पुढच्या भावी पिढ्यांचं काय?

गत इतिहास काहीही म्हणो; परंतु असत्‌च्या प्रभावामुळे सामान्य जन भांबावून जातात. भविष्यात काळोखाचा हुंकार त्यांना खुणावतो. या अस्वस्थतेतून जगत असतानाच एके दिवशी काही निश्चयाचे महामेरू असत्‌शी सामना करताना त्यांना दिसतात. त्या वीरांना एकाकी लढताना पाहून जनसामान्य हरखून जातात. स्फूर्तीचे तरंग त्यांच्या मनात उमटतात: जणू काही सत् त्यांच्या कानात ओरडून सांगत असतं, 'मी अजून जिवंत आहे!''

सत् आणि असत् हा संघर्ष तसा खूप पुरातन आहे. त्यावर अनेक महाकाव्ये रचली गेली आहेत; परंतु तरीही प्रत्येक कालखंडात या संघर्षाचं स्वरूप बदलत्या सामाजिक परिस्थितीप्रमाणे पालटलेलं आहे. म्हणूनच प्रत्येक वेळा नव्याने त्याचा अर्थ शोधावा लागतो. असाच एक शोध श्री. किशोर रणदिवे यांनी 'मी अजून जिवंत आहे' या पुस्तकात घेतला आहे. सत्ता आणि राजकारण हा या कादंबरीचा विषय असला तरी प्रचलित राजकीय कादंबऱ्यांहून ही कादंबरी खूप वेगळी आहे. इथे एकाधिकारशाहीचा किती अंमल आहे. स्वार्थी राजकारणाचा ऑक्टोपस इथे संपूर्ण समाजव्यवस्थाच गिळू पाहतोय. जीवनाच्या सर्व स्तरांवर विशिष्ट राजकीय विचाराचं हेतुतः प्रभुत्व ठेवलं जातंय. अगदी शिक्षणक्षेत्रदेखील त्याला अपवाद नाही. अर्थात माणसाला घडवण्याची प्रक्रियाच बदलते आहे. लोकशाहीला आपोआपच फास पडतोय. हे सारं थांबणार कुठे? की जॉर्ज आरवेलने '१९८४' या कादंबरीत वर्णन केलेला हुकूमशाहीचा थरार सामान्यांच्या नशिबी येणार?

सुकुमार बाकरे या सत्ताकांक्षी तरुणाची ही कथा. जहाल विचार याच्या मनात घोळत असत. आदर्शवादी लोकप्रिय नेता डीजींच्या सहवासात त्याचे नेतृत्वगुण फुलतात; परंतु 'सत्तेच्या राजकारणाला एकदा सुरुवात झाली की, शतकानुशतकांच्या संस्कृतीचे धिंडवडे उडालेच म्हणून समजा' अशा विचारांच्या डीजींकडे सत्तेची

मानसिकता नाही, हे सुकुमार वेळीच ओळखतो आणि डीजींपासून फारकत घेतो. स्वतःची स्वतंत्र संघटना काढतो.

या एकाधिकारशाही संघटनेचा प्रमुख झाल्यावर सुकुमार बाकरेचा 'ड्यूएल' झाला आहे. एका जहाल कार्यकर्त्याचा एकाधिकारशहा म्हणून जन्म होतो आहे. या ड्यूएलला गर्दीचं मानसशास्त्र चांगलंच ठाऊक असतं. भडक घोषणा तो देतो. काही वर्षातच सत्ता त्याच्याकडे चालत येते. ड्यूएल सर्वेसर्वा होतो.

ड्यूएलच्या एकाधिकारशाहीचा अंमल सुरू होतो. मुळात प्रश्न असा आहे की, एकाधिकारशाही ही संपूर्ण वाईट आहे का? तसं असेल तर माओच्या एकाधिकारशाहीतच चीन हे एक समर्थ राष्ट्र म्हणून उभं राहिलं, हे विसरता येत नाही. तसेच लोकशाहीला मर्यादा आहेतच की! असं म्हणतात की, स्वातंत्र्य, समता आणि सहिष्णुता या तीन आधारस्तंभांवर लोकशाही उभी असते; परंतु लोकशाही राष्ट्रात नेमकं काय आढळतं? ग्रीक तत्त्वज्ञ ॲरिस्टॉटलची लोकशाहीची व्याख्या थोडी वेगळी आहे. त्याला वाटतं, निर्धन लोकांची सत्ता म्हणजे लोकशाही; परंतु वस्तुस्थिती काय आहे? थोडक्यात चित्र वेगळे आहे. याच संदर्भात जी. एं. च्या एका कथेचाही विचार करता येईल. त्यांच्या 'विदूषक' या कथेत म्हटल्याप्रमाणे सर्व प्रश्न मताला टाकता येत नाहीत. कारण अल्पमतातील सत्याचा पराभव होऊ शकतो. म्हणजेच लोकशाहीतदेखील योग्य निर्णय घेणाऱ्या समर्थ नेतृत्वाची आवश्यकता असते. या समर्थ नेतृत्वाची लवकरच विभूतिपूजा सुरू होते आणि इथेच एकाधिकारशाहीचा जन्म होतो. ही एकाधिकारशाही जेव्हा सत्तेवरील आपली मांड घट्ट करण्यासाठी अभिव्यक्तिस्वातंत्र्यावरही मर्यादा घालते, तेव्हा तो प्रकार निंदनीय असतो आणि हे अपरिहार्य आहे. कारण रणदिव्यांनीच म्हटल्याप्रमाणे स्वतंत्र विचारांच्या आणि स्वयंप्रज्ञेच्या माणसांची हुकूमशहांना नेहमीच भीती वाटत आली आहे.

ड्यूएल नेमकं हेच करतो. आविष्कारस्वातंत्र्याची तो गळचेपी करतो. व्यक्तिस्वातंत्र्याची तो थडगी बांधतो. संगीत नाट्यकला अकादमीच्या रूपाने तो विचारवंतांना, कलावंतांना विकत घेऊ पाहतो. यांना सरकारी गुलाम बनवण्यासाठी मोठा दिमाखदार सोहळा होतो. काहींची प्रतिभा विकली जाते; परंतु 'सत्' हे सात प्रतिभावंतांच्या रूपात अजूनही 'जिवंत' राहतं. लोकनेते डीजी. स्वातंत्र्यचळवळीतील जेएस, नाटककार आनंदवर्धन, साहित्यिक मुक्तिवोध, शिल्पकार जी. विठ्ठल, संगीतकार कोटिमास्कर आणि नेपथ्यकार दोशी ही ती सात 'जिवंत' माणसे होत. ही माणसे सरकारी गुलाम होण्याचं नाकारतात. आता ड्यूएलशी संघर्ष सुरू होतो.

डीजी व जेएस यांना स्थानबद्ध करण्यात येतं, तर जी विठ्ठलांच्या स्टुडिओला आग लावली जाते. आनंदवर्धनवर भर नाट्यगृहात पोलिसी हल्ला होतो. पुढे सातही जणांना बंदिवासात टाकलं जातं आणि न्यायप्रणाली ? ती तरी कुठं मुक्त असते? थोडक्यात 'असत्' प्रबळ आहे आणि माणुसकीच्या मूल्यांसाठी 'जिवंतां'चीं त्याच्याशी लढाई सुरू आहे.

लेखकाच्याच शब्दांत -'महाभारताला शेवट नाही. अजून ते चालू आहे. आणि चालू

राहील युगान्तापर्यंत'.

संघर्ष सुरू होतो आणि हा संघर्ष वाचता वाचता वाचक नकळत आपल्या भोवतालच्या सामाजिक परिस्थितीचा विचार करू लागतो. हेच या कादंबरीचं यश आहे.

ड्यूएल, डीजी, जेएस, आनंदवर्धन, जी विठ्ठल, मुक्तिबोध आदी व्यक्तिरेखा लेखकाने अतिशय सुरेख चितारल्या आहेत.

राज्य जनतेचे आहे, माझं नाही. मी फक्त साक्षीदार आहे, असं म्हणणाऱ्या डीजींचं व्यक्तिमत्त्व एखाद्या दीपस्तंभासारखं भासतं. त्यांची नैतिकता वाचकाला भावते.

सुकुमार बाकरे ते एकाधिकारशहा ड्यूएल हा प्रवासही प्रभावीपणे रेखाटला आहे. स्वतःची सत्ता टिकविण्यासाठी सुरू असलेली ड्यूएलची धडपड भयचकित करते.

'मृत्यू ही काही अंतिम गोष्ट नाही' असं म्हणणाऱ्या आनंदवर्धनची हत्या वाचकाला चटका लावते. मृत्यूपूर्वी आनंदवर्धन आपल्या नव्या नाटकाची संकल्पना देतो. कलेच्या माध्यमाची परिणामकारकता तिथे दिसून येते.

मुक्तिबोधाच्या रचनांमधून आलेलं काव्य कादंबरीची परिणामकारकता वाढवतं.

विजनवासातही आनंदवर्धन नाटक करतात, तर मुक्तिबोधांना काव्य स्फुरतं. या दोन्ही घटना अभिव्यक्तीवर मर्यादा पडू शकत नाहीत, हेच सुचवतात.

मुक्तिबोधांना सरकारी पारितोषिक दिलं जातं; परंतु मुक्तिबोध ते नाकारतात. या घटनेची दखलही वर्तमानपत्रातून घेतली जात नाही. हा प्रसंग सदर कादंबरीत अतिशय योग्य प्रकारे आला आहे. वर्तमानपत्रासारख्या प्रभावी माध्यमाने आपली जबाबदारी झटकू नये हेच खरे!

डीजी, जेएस यांना जेव्हा कोर्टात उभे करतात, तेव्हा ते न्यायसंस्थेच्या मर्यादा उघड करतात. त्यांनी उडवलेली न्यायदानाची रेवडी वाचकाला विचार करायला लावते. न्यायप्रणाली राजकारणापासून दूर असण्याची आवश्यकता पटवून देते. न्यायप्रणाली ही सत्ताधीशांच्याही वर असावी. पण भ्रष्ट समाजव्यवस्थेला हे मान्य होणार का?

या कादंबरीचा 'फॉर्म' तिच्या विषयासारखा वेगळा आहे. रूढ अर्थाने ही कादंबरी नाही. सुरुवात, मध्य, शेवट या ठराविक चाकोरीतून इथे कथानक फिरत नाही. प्रसंगदेखील सलग नाहीत. इथे सुरुवातीला इतिहासाने 'लेखकाला' आवाहन केले आहे. सत्य लिहिण्याचे आवाहन! या सुरुवातीने कादंबरीला वास्तववादी परिमाण लाभले आहे. 'लेखक' या पात्राला नाव नाही, तर ते अभिव्यक्तीचे रूपक आहे. हा लेखक मध्ये मध्ये निवेदकाची तटस्थ भूमिका घेतो.

या कादंबरीतील घटना कधी निवेदनरूपाने तर कधी संवादरूपाने वाचकांपुढे येतात. या संवादांमध्ये नाट्य आहे. ते 'नाट्य वाचकाला पकडून ठेवते; परंतु या संवादांची 'लय' मात्र एकच आहे. वस्तुतः माणसाच्या स्वभावानुसार, त्याच्या व्यवसायानुसार भाषेचे वळण बदलत असते. एक मात्र निश्चित की, डीजी. या प्रज्ञावंतांच्या तोंडून लेखकाने 'विचारांचा एक खजिनाच उघडा केला आहे. त्या 'विचार-वैभवा'ने वाचक दिपून जातो. चिंतनातून प्रकट झालेले तत्त्वज्ञान येथे आहे.

कादंबरीची भाषा शोषणाला आव्हान देते. प्रसंगी सत्तांध राजकारणाची भीषणता

# दोन विचारधारांचा संघर्ष

## सुरेशचंद्र पाध्ये

'बुलंद' या नाटकाचे कादंबरीत रूपांतर करून कादंबरी लेखनात प्रवेश करणारे शिवराज गोर्ले हे प्रामुख्याने हलकीफुलकी नाटके लिहिणारे नाटककार म्हणून परिचित आहेत. परंतु बुलंद ही कादंबरी वाचताना त्यांच्यातला कादंबरीकार हा अधिक श्रेष्ठ लेखक असल्याचे माझे मत झाले होते. त्यांच्या 'सामना' या पूर्णपणाने स्वतंत्र अशा कादंबरीमुळे ते अधिक पक्के झाले. सामना ही कादंबरी मला गेल्या वर्षभरातील आवडलेल्या साहित्यातील एक महत्त्वाची कादंबरी आहे. शिवराज गोर्ले यांनी ती एम. एम. जोशी आणि शंतनुराव किर्लोस्कर ही व्यक्तिमत्त्वे आणि त्याहीपेक्षा अधिक या व्यक्तींच्या विचारधारा डोळ्यासमोर ठेवून लिहिलेली आहे. गोर्ले यांना या दोन्ही व्यक्तिमत्त्वांबद्दल विलक्षण आदर आहे. मात्र विचाराने ते शंतनुरावांची विचारधारा अधिक जवळची मानणारे आहेत. आइन रँड या लेखिकेचा त्यांच्यावर प्रचंड प्रभाव आहे आणि तिने आपल्या लिखाणातून मांडलेली विचारसरणी त्यांना लिहिते करण्यात महत्त्वाची ठरलेली आहे. सामना वाचल्यावर हे मत अधिक पक्के होते.

गोर्ले यांनी उद्योगक्षेत्रात 'पर्सोनेल ऑफिसर' सारख्या महत्त्वाच्या पदावरून काम केलेले आहे. उद्योगक्षेत्रातील कामगार समस्या त्यांनी जवळून न्याहाळली आहे. या अवलोकनाचा प्रभावही त्यांच्या लिखाणातून समोर येतो.

---

( मागील पानावरुन पूर्ण )

प्रकट करते: परंतु भडक मात्र होत नाही.

सखोल विचारांची बैठक असलेलं हे पुस्तक संपतं. तेव्हा वाचक सुन्न होतो. मूल्याधिष्ठित समाजासाठी नव्या पिढीतील विचारवंत काही करणार की निव्वळ भोगवादाचीच कास धरणार असा प्रश्न नकळत मनात येतो. अन्यथा मार्टिन ल्यूथर किंगने म्हटलंच आहे की, विचारवंतांचं मौन हे अधिक धोकादायक असतं.

असो. असा हा जिवंत संघर्ष मॅजेस्टिक प्रकाशनने आपल्या देखण्या निर्मितिमूल्यासह प्रसिद्ध केला आहे. त्याबद्दल त्यांचे अभिनंदन !

(**मी अजून जिवंत आहे**, किशोर रणदिवे, मॅजेस्टिक प्रकाशन, मुंबई ४ पृष्ठे १८४ शंभर रुपये)

सामना या कादंबरीचा विषय म्हणजे वर म्हटल्याप्रमाणे दोन विचारधारांतील संघर्ष हा तर आहेच पण त्याचबरोबर उद्योगक्षेत्रातील वास्तव आणि सरकारी धोरण , कामगार संघटनांच्या नेत्यांची धोरणे यांच्यातीलही तो एक सामना आहे . कादंबरीच्या सुरवातीस म्हटल्याप्रमाणे ही कादंबरी एका वास्तवावर आधारित आहे . त्यातील प्रमुख व्यक्तिरेखा या वास्तवातील व्यक्तींवर बेतलेल्या आहेत . पण या व्यक्तिरेखांचा कादंबरीतील प्रवास म्हणजे या व्यक्तींची चरित्रे नाहीत . ही कादंबरी म्हणजे इतिहास नव्हे . म्हणूनच वास्तवाची पार्श्वभूमी असलेला आणि पात्रे व प्रसंग पूर्णतः काल्पनिक नसलेला हा सामना लेखकाच्या कल्पनेतला आहे . पुस्तकाच्या मुखपृष्ठावर दोन व्यक्तिमत्त्वे आणि लाल झेंडे घेतलेले कामगार असलेले चित्र , प्रारंभीच्या पानावरचे शवनमचे चित्र , कारखान्याच्या बंद दरवाजावरचे झेंडे आणि पाट्या , त्याच्या मागील पानावरील मतपेटीचे चित्र या सगळ्या गोष्टी कादंबरी वाचायला घेण्यापूर्वीच वाचकाची एक मानसिक पार्श्वभूमी तयार करतात .

समाजवाद विरुद्ध भांडवलशाही आणि त्यांची प्रतीके म्हणून समाजवादी नेते श्रीधर शंकर उर्फ आप्पासाहेब लिमये आणि उद्योगपती अनंतराव नवाथे अशी लढत लेखकाने उभी केली आहे . अनंतरावांच्या नवाथेनगराची उभारणी त्यांचे वडील केशवराव नवाथे यांनी केली . या नवाथे नगरातून अनंतराव पुण्याला आले . केशवरावांनी ज्याचा पाया घातला तो उद्योग अनंतरावांनी प्रचंड प्रमाणावर वाढविला देशाचे भले , उद्योगांच्या वाढीमुळे होईल ही त्यांची एक व्यक्त - अव्यक्त अशी निश्चित धारणा आहे . आणि म्हणूनच उद्योगांवर आणि त्यांच्या विस्तारांवर कोणत्याही प्रकारची सरकारी बंधने असू नयेत , कामगारविषयक कायदे हेही या उद्योगाच्या वाढीला प्रतिकूल ठरणारे असू नयेत , असे त्यांचे स्पष्ट आणि स्वच्छ मत आहे . अप्पासाहेब लिमये हे स्वातंत्र्य चळवळीत भाग घेतलेले एक आदर्श समाजवादी कार्यकर्ते आहेत . लेखकाने त्यांच्या मुलाला एक उद्योजक बनवून बाहेरचा संघर्ष त्यांच्या घरातही आणला आहे . लेखकाच्या मुळातल्या नाट्यविषयक ओढीतून नाट्यात्मता जपण्यासाठी आणि वाढविण्यासाठी त्याने ही युक्ती वापरली हे स्पष्टच आहे . मात्र ते अतिशय परिणामकारकतेने त्याने वापरले आहे आणि त्यामुळेच ही योजना कृतक वाटत नाही .

नवाथेनगराची उभारणी असो की लोकमान्य टिळकांच्याच प्रभावाखाली झालेली अप्पासाहेबांची जडणघडण असो , तात्कालिक राजकीय , सामाजिक संदर्भाचा अतिशय चपखल वापर करून ओघवत्या शैलीत लेखकाने या पात्रांची पार्श्वभूमी तयार केली आहे . अप्पासाहेबांच्या स्वातंत्र्यलढ्यातील सहभागाबरोबरच त्यांच्या व्यक्तिगत आयुष्यातील प्रेमसंदर्भ आणि त्याची मोडतोड व संबंधित व्यक्तींची अनंतरावांसारख्या व्यक्तिमत्त्वाशी घालून दिलेली जोड ही लेखकाची काव्यात्म न्यायातून साकारलेली नाट्यमय कल्पना . ती कादंबरीच्या परिणामकारकतेला हातभार लावणारी ठरली आहे .

लेखकाने कादंबरीचे चार भाग केले आहेत . त्यातला पहिला भाग हा या व्यक्तिमत्त्वांची आणि विचारधारांची पार्श्वभूमी सांगणारा , दुसरा भाग त्यांच्या जडणघडीवर आधारित , तिसरा भाग वैचारिक पातळीवरचा संघर्ष उभा करणारा आणि

चौथा भाग मुख्यत्वेकरून लेखकाला जे तत्त्वज्ञान भारतीय पार्श्वभूमीवर मांडावयाचे आहे ते ठाशीवपणे मांडण्यासाठी वापरला आहे. या शेवटच्या भागामध्ये अजितेमच्या म्हणजेच अप्पासाहेबांच्या मुलाच्या तसेच नवाथ्यांच्या उद्योगांची कोंडी आणि त्या कोंडीतून अखेर निवडणुकीसाठी अनंतरावांना थेट उमेदवारी घ्यायला भाग पाडणे असा काही मार्ग त्यांनी पत्करला आहे. त्यातील शेवटचा अनंतरावांच्या भाषणाचा जो भाग आहे तो कादंबरीच्या तंत्राच्या संदर्भात वाचकांना कितपत पटेल याबद्दल शंका वाटते. मात्र त्या तंत्राच्या पार जाऊन अनंतरावांचे भाषण म्हणून त्यांनी जे तत्वज्ञान मांडले आहे ते महत्त्वाचे आहे, आणि अतिशय प्रभावी रीतीने लेखकाने ते मांडले आहे. या तत्त्वज्ञानाचा प्रतिवाद होऊ शकतो परंतु वाचक जेव्हा ही कादंबरी वाचून संपवतो त्यावेळी तो त्यातील विचारांनी भारावून जातो आणि दीर्घकाळ त्याच्यावर स्वतः विचार करीत राहतो. माणसाच्या विचारविश्वात खळवळ माजविण्याचे सामर्थ्य या कादंबरीत आहे आणि म्हणून ती महत्त्वाची.

शेवटच्या या भागात लेखक जे म्हणतो त्याचा एक मासला पाहण्याजोगा आहे... "स्वार्थ हा माझा जन्मसिद्ध हक्क आहे, ती माझी घोषणा आहे. लोकमान्यांची घोषणा काय होती ? स्वराज्य हा माझा जन्मसिद्ध हक्क आहे व तो मी मिळवीनच. या घोषणेतून 'स्व' 'मी' हे शब्द काढले तर काय उरेल ? 'स्व' महत्त्वाचा नसले तर 'स्व'राज्य हवेच कशाला; आणि 'मी' महत्त्वाचा नसेल तर ते मी मिळवायचेच कशाला ?...." हा युक्तिवाद काय किंवा "स्वातंत्र्यासाठी प्राण अर्पण करणे हा स्वातंत्र्यवीराचा 'त्याग' नसतो ती त्यानं स्वातंत्र्याच्या 'ईर्ष्येसाठी' मोजलेली किंमत असते. त्याच्या स्वाभिमानाची किंमत जीवनाच्या कुठल्याही क्षेत्रात 'स्व'तंत्रानं काही करू इच्छिणाऱ्या प्रत्येकालाच ती किंमत मोजावी लागते," हे तत्त्वज्ञान असो; अथवा "तुम्हाला गरिबांचे राहणीमान वाढवायचे असेल तर श्रीमतांचे कमी करण्यापेक्षा एकूणच संपत्ती आणि उत्पादन वाढविणाऱ्या गोष्टी करा ना" हे सांगणे काय, मुक्त भांडवलशाही अर्थव्यवस्थेचा पुरस्कार करताना लेखकाने हे अतिशय ठामपणे सांगितले आहे. आणि हे सांगण्यासाठी अप्पासाहेब आणि अनंतराव यांच्यात अप्पासाहेबांचा मुलगा तसेच अनंतरावांची पत्नी आदींचे भाववंध गुंफून एक चांगली मनःस्पर्शी कहाणी तयार केली आहे. उत्तम संवादशैली, प्रभावी प्रसंगनिर्मिती आणि तपशीलांचा संयत वापर यांच्या योगाने ही कादंबरी वाचकाला हातात घेतल्यापासून शेवटाला जाईपर्यंत बांधून घालते.

(सामना : शिवराज गोर्ले, इंद्रायणी साहित्य, पुणे ३०. पृष्ठे ५११. अडीचशे रुपये)
(सुरेशचंद्र पाध्ये, ११ मानसी, पत्रकारनगर, पुणे ५३ )



अनुक्रमणिका

परवाल : बाबाराव मुसळे

# संघर्ष अस्तित्वाचा

प्रा. कृष्णा चौधरी

'हल्या हल्या दूध दे' नंतरची 'पखाल' ही वावाराव मुसळे यांची ग्रामीण कादंवरी.

'झाडाझडती'त धरणाच्या पुनर्वसनामुळे जशी विस्थापितांची वाताहत होते, तशी 'पखाल' मधेही पुंजाच्या जीवनाची वाताहत झालेली आहे. नळ योजना येणार या घटनेने पुंजाला वेड लागेल असे गिरजाला वाटते. पुंजाही या वृत्ताने हादरून जातो; पण वरवर तो तसे दाखवीत नाही. 'मुत्तामारी आली. नळयोजना काय? कपाळाचं कातडं नेणार आहे ती आमच्या? जाऊ दे'हांडीत ती नळ योजना? ' या गोष्टीवर आण भले अर्धी भाकर. खाऊ दे त्या नळयोजनेचं तेरसं." असं तो म्हणतो.

पुंजा हा ग्रामीण ग्रामीण संस्कृतीतील बलुतेदार. पखालीमुळे आठ पायल्या ज्वारी, तूर, उडीद, मूग याची अधली अधली दाळ, अर्धा किलो मिरच्या व दररोजची भाजीभाकर त्याला मिळत असे. कधीकधी खळेपाणी खुडल्यावर रानवळाही मिळायचा. पुंजा हा हजारो वर्षापासून जे कष्टकरी जीवन जगत आहे त्या कोळीजीवनाचे हे प्रातिनिधिक चित्रण आहे. नळ योजना येणार असल्यामुळे त्याचा परंपरागत चरितार्थाचा धंदा बंद पडून त्याच्यासमोर जीवनमरणाचा प्रश्न उभा राहतो. या दुःखाच्या महावर्तुळात त्याच्यासह गिरजा, दगडू, हरीभाऊ, सुमन कचरी व राजू हा गोतावळाही गरगरत राहतो. 'पखाल' मधील ग्रामीण लोकजीवन पिळीजात सूडाच्या संघर्षातून पुढे जात असते. शेवटी एक दिवस नळयोजना येतेच. पुंजाला पुरते वेड लागते. पखालीची गरज नसतानाही तो रात्री अपरात्री पखालीने पाणी भरतच असतो. म्हैस नेहमीच्या सवयीने लोकांच्या दारावर जातच असते. मोजके काही लोक त्याचे दुःख समजून घेतात. तर काही तो मुद्दाम बलुत्यासाठी नाटक करतो असे समजून त्याचा उपहास करीत असतात. पखालीचा धंदा बसल्यामुळे त्याने आपली पत्नी व सून धंद्याला लावावी असेही बोलले जाते. या बोलाने तो अधिकच दुखावतो व वेडा होतो.

ग्रामीण वऱ्हाडी बोलीचा व अर्थपूर्ण वाक्प्रचार व लोकजीवनातील म्हणींचा औचित्यपूर्ण उपयोग केला आहे. ग्रामीण जीवनातील परंपरा व संकेत सहजतेने व्यक्त होतात. उदा. दगडू व सुमनचे वैवाहिक जीवन सुरू होण्यापूर्वी सुदीच्या महादेवाला जाऊन यात्रेत त्याची पूजा करणे.

खेड्यातील दारिद्र्य व विषमतेशी चाललेला संघर्ष पुंजाचा हा आजच्या

असे हेर अशी कारस्थाने : वसंत सराफ

# एका पाकिस्तानी हेराची कथा

## प्रा. भा. श्री. परांजपे

एखाद्या विशिष्ट गोष्टीबद्दल वाचकांचे कुतूहल जागवणं आणि त्या कुतूहलाची पूर्तता करताकरता साहसपूर्ण जगाचे दर्शन घडविणे हा लोकप्रिय लेखकांचा आवडता छंद आहे. त्यातूनच साहस कथांचे एक जग निर्माण झाले आहे. पाश्चात्य देशातील 'रहस्यकथा' काही काळ आपले अधिराज्य गाजवीत राहिली. एखाद्या जवाहिऱ्याची चोरी, सरदार स्त्रीचा खून, महत्त्वाच्या व्यक्तीचे अपहरण यासारख्या डिटेक्टिव्हांच्या गोष्टी आज मागे पडल्या आहेत, आणि जेम्स बाँडच्या हेरगिरीच्या नव्या थरारकथा वाचण्यास उत्सुक झालो आहोत.

मुंबईच्या वाणिज्यदूतावासाची पाकिस्तानी योजना संपुष्टात आली याबद्दलच्या बातम्या वाचकांना अपरिचित नाहीत. तसा दूतावास पुन्हा 'मुंबई'त स्थापन झाला आहे अशी कल्पना करून वसंत सराफांनी एका चाणाक्ष पाकिस्तानी 'डिप्लोमॅट'ची कथा 'असे हेर अशी कारस्थाने' या कादंबरीत खुलवून सांगितली आहे.

पाकिस्तानी पोलीस खात्यातील अकराम रियाझ हा गुप्तहेरखात्यात प्रवेश मिळवितो, मुंबईत येऊन थोड्याच काळात आपले बस्तान बसवितो. त्यासाठी महाराष्ट्रातल्या भिन्न भिन्न पेशाच्या आणि प्रवृत्तीच्या व्यक्तींशी संधान साधतो. इकबाल सोझा ह्या मुस्लीम वकिलामार्फत तो सुखलाल गुप्ता, किलिपाडिया, फर्नांडिस अशा मुंबईतल्या मोटमोठ्या व्यक्तींवर आपल्या गोडबोल्या व लाघवी स्वभावाने छाप पाडतो.

---

(मागील पानावरून पूर्ण)

जनसामान्याचा जीवनाच्या अस्तित्वाचा संघर्ष आहे. तो एक वर्गीय संघर्ष आहे. काळं शोषक व शोषित ही जाणीव या वर्गसंघर्षाच्या मुळाशी आहे. ग्रामीण जीवनातील वास्तव व ग्रामीण मनातील महादुःखाचा प्रवास इथे साकार झालेला आहे. स्वातंत्र्यपूर्व काळातील भालेकरांच्या बळीबा पाटील पासून बाबाराव मुसळे यांच्या 'पखाल' पर्यंतचा प्रवास हा जनसाहित्यातील मैलाचा दगड ठरावा.

(पखाल : बाबाराव मुसळे, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे. पृष्ठे १८०, शंभर रुपये)

(प्रा. कृष्णा चौधरी, रामाळेश्वर वार्ड, रामटेक)

०००







ही कथा पाकिस्तानी हेराचे कौशल्य दाखवते. भारतातील गुप्तचर खात्याची ढिलाई व निष्क्रियताही लक्षात आणून देते. सुदैवाने आपली गुप्तचर यंत्रणा सावध होऊन नंतर दक्षता वा कौशल्य प्रकट करते तेव्हा बरे वाटते.

राजकीय व राजकारणी व्यक्तींवर आधारलेल्या कादंबऱ्यांतून ज्या पार्ट्या झळकतात त्यांचे एक स्वतःचे महत्त्व तर असतेच. पण त्या वातावरणाचा रंग कथानकालाही गूढता आणतो. माडखोलकरांनी आपल्या राजकीय कादंबऱ्यांत चर्चा, बैठकी व पार्ट्या यातून गहिरे रंग आणले आहेत, त्यांची आठवण होते. या श्रीमंती व विलासी वातावरणाची उपस्थिती येथे अपवादादाखल आहे. जेम्स बॉंडच्या कादंबऱ्यांत आकर्षक तरुणींचा सुळसुळाट असतो. नाही म्हणायला निरनिराळी पंचतारांकित हॉटेले, टर्की, कॉफीसारखे लज्जतदार पेय, मुंबईचे उच्चभ्रू वातावरण यामुळे कथेची खुशबू वाढते.

कादंबरीचा शेवट दोन भिन्न टोकाकडे घेऊन जातो व त्यातून मुख्य पात्रांना आलेले अपयश लक्षात घेता तिला कळतनकळत एका शोकात्मकथेचे रूप येऊ पाहात आहे, हेही जाणवते. पण अशा ट्रॅजेडीतून वा शोकात्मिकेतून जे वास्तवाचे भान आमच्या पदरात पडते ते निःसंशय सुखकारकच वाटावे.

गूढता, भयानकता, आश्चर्य व उत्कंठा यांचा आळीपाळीने प्रत्यय देणारी ही कथा चटकदार आहे.

(असे हेर अशी कारस्थाने - वसंत के. सराफ पुणे, वर्धमान प्रकाशन, पृष्ठे २४८, सव्वाशे रुपये)

(प्रा. भा. श्री. परांजपे, हनुमानगड, वर्धा)

०००

---

सत्यप्रिया गांधारी : सुमती क्षेत्रमाडे

# गांधारीचे वैशिष्ट्यपूर्ण व्यक्तिमत्त्व

## श्रीकृष्ण केसरी

'सत्यप्रिय गांधारी' ही सुमती क्षेत्रमाडे यांची महाभारतातील प्रमुख राजस्त्री-गांधारी हिच्या जीवनावर आधारलेली एक महत्त्वपूर्ण कलाकृती आहे.

कुठल्याही पुस्तकाचे परीक्षण म्हणजे ते पुस्तक वाचत असताना त्या पुस्तकाविषयी मनात येणाऱ्या उलट सुलट विचारांचा मागोवा! महाभारताची कथा ऐकून, वाचून किंवा पाहून जनसामान्यांच्या मनात गांधारीबद्दलची भावना रूढ झालेली आहे की, 'गांधारीने डोळ्याला पट्टी बांधून घेऊन कुरुकुलावर अन्याय केला. तिने असे करायला नको होते!' ही भावना बदलून गांधारीने केले ते योग्यच व ती शेवटपर्यंत सत्यप्रियच राहिली, असे

या कादंबरीतून लेखिकेला दाखवायचे आहे. आणि या प्रयत्नात लेखिका यशस्वी झाली आहे. महाभारतासारख्या गहन कथाभागातील दुर्लक्षिलेल्या पात्रावर लक्ष वेधून त्या पात्राचे महत्त्व सिद्ध करण्याचा प्रयास म्हणजे ही कादंबरी!

या कादंबरीच्या प्रस्तावनेत लेखिकेने स्पष्ट लिहिलेले आहे : 'महाभारत पुनः पुनः वाचताना मला जशी गांधारी दिसली - जाणवली तशी ती माझ्या वाचकांच्या पुढे आणीत आहे.' वाचकांच्या पुढे महाभारततली स्वतःला भावलेली गांधारी आणताना लेखिकेने कथनशैली, निवेदनशैली व संवादशैली यांचा सुंदर उपयोग केला आहे. त्यातून महाभारतकालातील विविध घटनांचा, भौगोलिक वर्णनाचा, निसर्गदृश्यांचा सुंदर देखावा उभा केला आहे. पात्रांच्या मनातील भावनांचे, विचारांचे प्रगटीकरण सुंदर शब्दात चातुर्याने लेखिकेने केलेले आहे. संवादशैलीतून महान सत्याचे दर्शन घडविलेले आहे. '... जगातील सर्व सुखे आत्मसुखापुढे तुच्छ असतात. आत्मचिंतनाने आत्मसुखाचा लाभ करून घेण्यातच मानव जीवनाचे सार्थक आहे' व्यासमुनी धर्मराजाला म्हणतात. (पृ. ३५) सूर्यकवच लिहिणारा विद्वान ब्राह्मण 'सांब' हा महाभारतकालीन होता. (पृ. ४१) महर्षिव्यास सत्यवतीचे पुत्र होते. (पृ. ४१) संजय हा व्यासांचा शिष्य धृतराष्ट्र - गांधारी - विदुर यांचे समवेत वानप्रस्थाश्रमात जातो (पृ. ५३) अशा विविध गोष्टींचे ज्ञान सहजपणे होते. पृ. ५२ ते ५३ कुंतीचे पुत्रांना उद्देशून केलेले भाषण फारच मर्मभेदी वाटते. संपूर्ण कादंबरीत वऱ्याच ठिकाणी संस्कृत श्लोकांचे भाषांतर वाचायला मिळते.

'माणूस दैवाधीन असतो हे सत्य एकदा समजलं की दुःखही अंगवळणी पडून जातं...' (पृ. ५९) गांधारीने कुंतीला दिलेले हे उत्तर तिच्या सत्यप्रिय स्वभावाला साजेसेच आहे. ' जिकडे धर्म असेल, सत्य असेल तिकडे जय असो.' (पृ. ४०६) असा उलट आर्शीवाद गांधारी दुर्योधनाला पाठवित असे. दुर्योधन मारला गेला याचे दुःख गांधारीला नाही, परंतु 'अन्यायाने तो मारला गेला म्हणून संताप झाला' (पृ. ४०४) असे गांधारी म्हणते. दुर्योधनाने अनेक वेळा अन्यायाने पांडवांना वागवले तेव्हा त्यालाही अन्यायानेच मरण येणार हे कटु सत्य गांधारी जेव्हा स्वीकारत नाही, तेव्हा खरोखरच गांधारीला 'सत्यप्रिय' म्हणावे का हा प्रश्न पडतो! तरी पण मनोरंजनाच्या व इतर ऐतिहासिक, भौगोलिक ज्ञानाच्या दृष्टीने कादंबरी फारच चांगली आहे.

( सत्यप्रिया गांधारी : सुमती क्षेत्रमाडे, सन पब्लिकेशन्स' पुणे ३०.
पृष्ठे. ४२७ एकशे दहा रुपये)

(श्रीकृष्ण केसरी, 'सु-श्री' बंगला, आश्रम रोड, उरुळीकांचन,पुणे, ४१२२०२ )

०००

# नाट्यमय आणि कल्पनारम्य कलाकृती

श्री. पु. गोखले

प्रथितयश लेखक श्री. भा. द. खेर यांची नवी कादंबरी 'पूर्णाहुती' नारळी पौर्णिमेला मोठ्या थाटात प्रसिद्ध झाली. त्यांच्या लेखनाच्या वेगापुढे प्रत्यक्ष पुस्तक प्रकाशनाची गती कमी पडते! स्वा. सावरकरांच्या अद्‌भूत जीवनावर आधारलेली ही कादंबरी प्रसिद्ध करून खेर यांनी लेखन प्रांगणातलं शतक पूर्ण केलेलं आहे. चरित्रात्मक कादंबऱ्यांचे पर्व त्यांनी सुरू केलं आणि लाल बहादूर शास्त्री, गौतम बुद्ध, आर्य चाणक्य अशा भारतीय परंपरेतीलच नव्हे तर ख्यातमान नट चार्ली चॅपलीन - अशा व्यक्तींचं त्यांनी ललित स्वरूपात चित्रण केलेलं आहे.

तसं पाहिलं तर स्वा. सावरकरांच्या जीवनावरील 'पूर्णाहुती' ही त्यांची कादंबरी दुसरी आहे. 'यज्ञ' या नावाने सावरकरांच्या रोमांचकारी जीवनावर २५ वर्षांपूर्वी त्यांनी पहिली कादंबरी लिहिली. 'यज्ञ' ला वाचकांचा भरघोस पाठिंबा मिळाला. कादंबरी ही बहुतांशी कल्पित कथा असते. आपल्यासमोर किंवा नजिकच्या काळात जीवन व्यतीत केलेल्या व्यक्तीच्या कथेला ललितरम्य स्वरूप देणं फार अवघड असतं. ऐतिहासिक कादंबऱ्या लिहिताना कल्पकतेला भरपूर वाव मिळतो. लेखक कल्पनासृष्टीत रमला तरी त्या ललितकृतीला फार बाधा येत नाही. परंतु प्रचलित काळात ज्यांनी कर्तृत्वपूर्ण कामगिरी केली त्यांची जीवनकथा, स्थूल स्वरूपात का असेना, वाचकांना ज्ञात असते. त्यामुळे अशा पुरुषाची जीवनकथा कादंबरीच्या सूत्रात गुंफणे हे फार अवघड असते. तो तारेवरचाच खेळ असतो. एखादी घटना, ललितरूप देताना थोडीफार अतिरंजित झाली किंवा काही प्रसंग चरित्रात योग्य वाटले तरी ते कादंबरीच्या तंत्रात वा सुसूत्रतेत बसत नसल्यामुळे लेखकाला गाळावे लागले तरी एखादा अभ्यासू वाचक आक्षेप घेतो. कादंबरी म्हणजे संपूर्ण चरित्र कथन नसते हे अभ्यासूंच्या आणि त्या महापुरुषांच्या भक्तांच्या ध्यानात येत नाही : लेखकाला कल्पित आणि सत्य यांचा तोल सांभाळत वाटचाल करावी लागते.

श्री. खेर यांनी निवडलेल्या चरित्र नायकाचे जीवन असंख्य प्रकारच्या घटनांनी समृद्ध आहे. किंबहुना सत्य हे कल्पितापेक्षाही अद्‌भूत असते. ही उक्ती कशी शंभर टक्के खरी आहे याचे प्रत्यंतर आपल्याला स्वातंत्र्यवीर सावरकरांच्या सुदीर्घ चरित्रावरून येते. त्यामुळे सावरकरांवर लालित्यपूर्ण माध्यमातून लिहिणाऱ्या लेखकाला

कल्पनेच्या भराऱ्या मारण्याची जरुरी भासण्याचे कारण नाही.

सावरकरांनी सशस्त्र क्रांतीची शपथ घेऊन 'मारता मारता मरेतो झुंजेन' असे व्रत घेत स्वतःला स्वातंत्र्यप्राप्तीच्या यज्ञात झोकून दिलं. खेरांनी त्यांच्या जीवनपटातील एकेक समिधा टाकीत या ललितरम्य कथनाचं यज्ञकुंड चेतवून दिलं. खंडित हिंदुस्थानचं स्वातंत्र्य मिळालं याचं दुःख व्यक्त करीत या क्रांतिवीरानं आपल्या निवासावर हिंदुत्वाचा भगवा ध्वज आणि राष्ट्रानं स्वीकारलेला तिरंगा उभारून स्वतःच आरंभिलेल्या यज्ञाची मनोमन समाप्ती करताना हुतात्म्यांच्या स्मरणार्थ पणत्या प्रज्वलित केल्या. पारतंत्र्याची पूर्णाहुती पडल्यानंतर साहजिकच स्वातंत्र्ययज्ञाची सांगता झाली होती.

कथानायकाच्या तेजस्वी जीवनाचे असे चित्रण केल्यानंतर त्यांच्यावरच दुसरी कादंबरी लिहिण्यासाठी लेखणी हाती घेता घेता बहुप्रसव खेरांना लेखनाचा सूर सापडत नव्हता. त्यांनी स्वतःच स्पष्ट केल्याप्रमाणे जगावेगळे अलौकिक आणि द्रष्टेपणाचे मार्गदर्शक विचार कोणत्या शैलीनं मांडायचे या समस्येनं त्यांना ग्रासलं होतं. कोणत्याही समस्येवर सतत मन एकचित्त केलं किंवा पातंजल योगदर्शनात सांगितल्याप्रमाणे सतत संयम केला म्हणजे ती समस्या सुटते हा अनुभव या लेखकाला आला आणि त्यांच्या लेखणीची कागदाशी भेट होऊन पूर्णाहुती ही कादंबरी जन्माला आली.

सारी कर्तव्ये पूर्ण झाल्याने धन्योहम् धन्योहम् असं म्हणत स्वा. सावरकरांनी प्रायोपवेशन सुरू करून प्राणार्पण केलं हे सर्वांना माहीत आहे. या अवधीत ते फारसे कोणाशी बोलत नव्हते. क्रमाक्रमाने त्यांची सारी गात्रं शिथिल होणं नैसर्गिक असलं तरी त्याचं अंतर्मन सतत जागृत होतं. त्या मनःचक्षूसमोरून त्यांचा सारा जीवनपट सरकत असलाच पाहिजे. त्या अवस्थेत त्यांना स्वप्न पडत असतील. भास होत असतील. त्यांचं सतत सावध असलेले मन व्यक्ती समोर आणून त्यांच्याशी युक्तिवाद करीत असतील. मतं प्रतिपादन करीत असतील. त्यांचे हे संभाव्य संवाद आणि त्या महान पुरुषाच्या तत्त्वज्ञानाचं प्रतिपादन टिपत गेलो तर एक सर्वस्वी नवीन तंत्रानं आणि निवेदनशैलीनं लिहिलेली कादंबरी वाचकांना सादर करता येईल असं त्यांना जाणवलं! तो विचार लेखकानं कृतीत आणून ही ललितकृती आपल्या हातात दिली आहे.

अंदमानचा कर्दनकाळ जेलप्रमुख बारी सर्वांच्या अगोदर त्यांच्या मनासमोर येणं साहजिकच होतं. या आयरिश काराधीपाला पश्चात्ताप होत होता. इंग्लंडमधून त्यांना हिंदुस्थानात आणणारा पोलीस अधिकारी पारकर पुन्हा या क्रांतीच्या घातक फंदात पडण्यापेक्षा बॅरिस्टरीत पैसा कसा मिळतो हे सांगत होता. चंद्रगुप्ताला सम्राट पदावर बसविणाऱ्या आर्य चाणक्याला भेटावं असं सावरकरांच्या मनात येणं क्रमप्राप्तच होतं! पदावरील राजकारण्यांची चैन, स्वार्थ, देशहिताकडे होणारं दुर्लक्ष, फसव्या घोषणा यांच्याबद्दलची संभाव्य चर्चा, गांधीजींनी खिलाफतीच्या चळवळीपासून स्वीकारलेलं देशघातक धोरण अशा विषयांची चर्चा करण्यासाठी तात्यारावांना प्रायोपवेशन चालू असतानासुद्धा भेटावंसं वाटण्याची लेखकाची कल्पना योग्यच म्हटली पाहिजे. गुरू गोविंदसिंग, प्रतापी बाजीराव, कीर्तीच्या शिखरावर पोचल्यावर 'स्वतःचा कान धरण्याचा अधिकार दिलेले' शिवाजी महाराज, बहादुर शहाचा आणि गांधी वधाच्या



अनुक्रमणिका

अभियोगात वसर्ना करावयास लागलेला दिल्लीचा लाल किल्ला, १८५७ च्या स्वातंत्र्ययुद्धातील रणरागिणी लक्ष्मीबाई, कुंवरसिंग, नानासाहेब पेशवा, तात्या टोपे, सुदर्शनधारी श्रीकृष्णाची आळवणी, वासुदेव बळवंत फडके, चाफेकर बंधू, मदनलाल धिंग्रा, सुभाषचंद्रांची भेट आणि त्यांनी दिलेला कानमंत्र, बाबासाहेब आंबेडकर आणि त्यांचं धर्मांतर, प्रिय मातृभूमीच्या फाळणीच्या वेदना आणि अखेर सहधर्मचारिणी पत्नी माई . . . कोणाकोणाची आणि नावं तरी किती सांगावयाची?

खेरांनी स्वीकारलेल्या शैलीमुळे त्यांना कादंबरीच्या स्वरूपात नायकाच्या सुदीर्घ जीवनाचा आणि कार्याचा आढावा घेत, सावरकरांनी स्वतः आग्रहाने प्रतिपादलेल्या तत्त्वज्ञानाचा तेजस्वी विचार, अखंड, बलदंड, हिंदुराष्ट्राची जीवननिष्ठा परखड आणि प्रत्ययकारी संवादाच्या रूपाने अंतर्भूत केली आहे.

सर्वस्वी जगावेगळ्या निवेदनतंत्राची आणि लेखनशैलीची ही कादंबरी आहे असा लेखकाचा दावा आहे. काही असले तरी एका महापुरुषावरील या कल्पनारम्य आणि नाट्यमय कलाकृतीचा आस्वाद वाचकांनी घ्यावा असे वाटते. यात वर्णिलेल्या प्रसंगांचे कोणा समर्थ लेखकाने आणि दिग्दर्शकाने नाटकाच्या किंवा दृक्‌श्राव्य माध्यमातून प्रदर्शन केले तर ते अधिक प्रभावी ठरेल !

( पूर्णाहूती : भा. द. खेर, शशीदीप प्रकाशन, ४४ मुकुंदनगर, पुणे ३७, पृष्ठे ३५०, अडीचशे रुपये )

( श्री. पु. गोखले,
कमलश्री, ३० पारिजात कॉलनी, बिबवेवाडी रोड, पुणे ३७ )

०००

## नवीन आजीव सभासद

### पुणे

बाळकृष्ण विष्णू सोमण
रामनिवास लक्ष्मीनारायण आगरवाल
अहिल्या रत्नाकर कुलकर्णी
सत्त्वशीला विठ्ठल सामंत
सौ. स्मिता सुहास देशपांडे
सौ. श्रद्धा भातंब्रेकर
सौ. गायत्री रवींद्र चांदोरकर
विजय रामभाऊ लोणकर
शांता वासुदेव राजंदेकर
प्रदीप प्रभाकर प्रभुणे
सौ. अनुराधा नारायण आठवले
प्रकाश केशव पाटेकर
प्रकाश शंकरराव जोशी
संजय सदाशिव कुलकर्णी
नीलिमा केशव सोलापूरकर
अनुराधा रत्नाकर कुलकर्णी
सौ. जयश्री अरुण घारे
सौ. शिल्पा मंजुनाथ शेट्टी
सौ. शोभा बाळासाहेब इंगवले
प्रमोद ज्ञानेश्वर आडकर
कृष्ण शिवराम हेगडे
रा. ग. जाधव
शिवराज दत्तात्रय गोर्ले
मारुती गोविंदराव दिडमुठे
गजानन वि. जोशी
विनायक मधुसूदन नामजोशी
निंदराज असराजी जाधव
सौ. जयश्री गजानन पाटक

# अदृष्टांशी प्रेमळ संवाद

अरविंद दोडे

निरंजन उजगरे यांचा 'दिपवा' हा सहावा कवितासंग्रह.

दिपवा म्हणजे सारा दिवस ढगांची अंधारी असताना मध्येच थोडा वेळ ढगांतून येणारे सूर्याचे किरण.

समस्त धर्मांनी एक अज्ञात शक्ती मान्य केलीय. त्या विश्वनियंत्याला आस्तिकांनी आपला कर्ताकरविता मानलंय. प्रार्थना वेगवेगळ्या असल्या तरी त्या साऱ्या स्तवनांचं सार एकच असतं. प्रकृति-पुरुषाचा वरदहस्त साऱ्यांनाच लाभतो असं नाही. ज्यांना तो लाभला त्यांनी 'त्या'चे उपकार शब्दांत मांडण्याचा प्रयत्न केला. वेदपुराणांनी जिथं नेति नेति म्हटलंय, तिथं तुम्हां आम्हां सामान्य जनांचं काय? उजगरे यांनी 'दिपवा' मध्ये असाच एक प्रयत्न केलाय. 'त्या'ला शब्दांत रेखण्याचा. प्रयत्न हा शब्द मात्र अगदी 'सहजपणे' अशा अर्थानं घ्यावा. कारण, 'त्या'च्याशी संवाद साधताना सामीप्य अन सायुज्य सुख लाभलंय, ह्याचा 'दिपवा' वाचताना प्रत्यय येतो.

पहिलीच कविता संपूर्ण संग्रहाचं 'तात्पर्य' ठरावी अशी आहे.

'तुझ्या अथांग असण्यासाठी खूपच लहान पडेल
भिंतीवरची एखादी चौकट
तर लाविन म्हणतो
रिकामीच चौकट
तू सहज कधीही येऊन जा
चौकटीच्या आरपार.'

त्याच्या नावानं साऱ्या सृष्टीलाच कवी आत्मिक प्रेमाचं पांघरुण घालतो. सृष्टीच्या वैभवानं आपला आत्माही नटवतो. शाश्वत काळाकडे त्याची दृष्टी आहे. मनाचा धनी. विश्वप्रेमांन भरलेला. आत्ममग्न आणि तितकाच यथार्थभाषी.

'ह्या देहातून घणघणतोय आता
निर्णायक घंटेचा अविरत आवाज
बाहेर सूर्य तळपणारा,
आत ज्योतीची वरात,
बाहेर वृक्षतोडीचे आवाज,

आत पालवी फुटल्याचे हुंकार' (कविता २)

अशी ही अंतर्मुखता. आतल्या वहराची किमया. आनंदाचा शोध घेत भटकंती करताना तो इथं दिसत नाही तर तो स्वतःच आनंदमयी होऊन गातोय. त्यानं वाणी मोकळी केलीय. मन उघडं केलंय. कवी संग्रहवादी आहे, आग्रहवादी नाही. सद्‌विचारांचा संग्रह वाढत चालला की आपली आग्रही भूमिका सौम्य होते. कालांतराने लोप पावते, उरतो केवळ कैवल्याचा आनंद. वात्सल्याचं चांदणं. कारण 'तो' सुरुवातीला आपल्या रक्ताच्या थेंवाथेंवात, देहाच्या कणाकणात मित्रासारखा झिरपत जातो. मग ठामपणे मुळावत जातो संवेदनाच्या खाजगी प्रदेशात. 'तो' देहातून वाहताना गोठत गेल्यावर-वेदना होतात. अशा वेळी कवी म्हणतो,

'तुझ्याशी नातं ठेवण्याची किंमत
समजून चुकली तरी,
आता माझ्याकडे
निर्णयाची संधीच नाही उरली.' (३)

त्या अव्यक्ताशी नातं म्हणजे विजेशी खेळ! सर्वस्वाचं दान केल्याशिवाय तो सर्वस्वानं आपला होतच नाही. वेद म्हणतात. 'आधी मरण मग जीवन' हे संपून जाणं म्हणजेच समर्पण. अन एकदा सर्मपण केल्यावर निर्णयशक्ती तरी उरते का? कोलाहल ओसरताना त्याची निःशब्द हाक वेढत जाते... मग तो दिसत राहतो भर दुपारी चकाकणाऱ्या समुद्रात. काळोखात घुटमळणाऱ्या काजव्यात. डोळ्यांना 'दिपवत' राहातो. असा हा छळवादी लपंडाव! पण आपल्या पावलांची धाव कुठपर्यंत ? फाटकापर्यंत.... इथंच सारं स्वच्छ दिसत. मग पटतं जीवाशिवाच्या नात्यातलं गूढ. कवी म्हणतो, 'तूच आता सवंगडी माझा, तूच टोल उशीर झाल्याचा, तूच केवळ लपण्याची जागा.' (४)

व्यक्ती आणि विश्व यांना व्यापणारं अद्वैत म्हणजे केवळ बुद्धीचा विलास नव्हे. या कवितेत सेवाभाव, मित्रभाव, संयम, मनन-चिंतन आहेच. साऱ्या चराचराशी एकरूप होण्याची तरल आत्मीयताही पानोपानी जाणवते.

आणखीन एक गोष्ट निदर्शनास येते. ती म्हणजे विरोधाभास.

"हे कोरड्या नद्यांचे किनारे
आणि फुलांचे अदृष्य धुमारे
फोडू पाहताहेत बंद कवाडे..." (५)

यातील प्रत्येक कविता म्हणजे असा आध्यात्मिक प्रवासामधला एकेक टप्पा आहे. हा आध्यात्मिक प्रवास कुठे सुरू झाला? कुठल्या वळणापर्यंत तो घेऊन जाणार आहे?... कवी म्हणतो, काळ दरवळला. आणि ढगांचं भान आलं. 'त्या'नं आपल्याला एक साम्राज्य दिलंय. त्याचा सांभाळही 'तो'च करणार आहे.

जोपर्यंत अपूर्णता आहे तोपर्यंत प्रिय-अप्रिय हा विभक्तभाव विरणार कसा? अहंभाव आधी नष्ट होऊ दे. मग तो प्रकाशाचं दान घेऊन येईलच येईल. त्याची पूजा म्हणजे त्याला रोज कणकण मिळवायचं असं नाही. तर आपण रोज स्वतःला तीळतीळ देऊन टाकायचं.

तामसगुणांचा बाजार पावलोपावली भेटतोच . त्यातून मार्ग काढायचा . राजसगुणालाही टाळून सत्त्वापर्यंत आत्म्याचं पर्यटन बघायचं . अखेरचं जे ठिकाण—तेच परम तीर्थक्षेत्र . त्यापुढे काही नाही . पण हे पर्यटन म्हणजे - "आपल्यातल्याच अरण्याला तुडवत, तोडत, शोधत जाणं फार कठीण जातं ." (३९)

जीव तगमगतो - एकसंध आरशात स्वतःला एकदा तरी पाहण्यासाठी ! हळूहळू काळाचं गणित हरवलेला प्रहर चोहोबाजूंनी दाटून येतो . हाच पोरका प्रहर आभाळाचा अतूट लळा लावतो . मग प्रहर बदलतात . 'त्या'च्या नजरेच्या क्षितिजावर रेंगाळणाऱ्या छटेनुसार . . . . नंतर ढगाखाली चिंब व्हायचं . . .किंवा ढगामध्ये सामील व्हायचं !

कधीकधी 'तो' आपली चमक दाखवून जातो . त्या थोड्याशा अस्फुट दर्शनानं अहंकार अंकुरतो . तेव्हा कवी उद्गारतो, "बाळवीसारखा पसरत चाललाय तुला समजून घेतल्याचा गैरसमज ." (४८)

लोक बदलत नाहीत . ते तसेच राहतात . स्वामी विवेकानंदांनी म्हटलंय ."समाजसेवा करून समाज सुधारत नाही . समाज सुधारतो स्वतःला ." तेव्हा 'दृष्टी' बदलणं महत्त्वाचं . या कवितेतली वाळवी 'बुवाबाजी'चं छुपं रूप आहे . त्यापासून साधकानं स्वतःला सावध ठेवावं . चमच्यातल्या पाण्यात बुडणारे लाखो , समुद्रात बुडणारा लाखात एक ! अनेक अजाण जीव इथ-तिथं 'त्या'च्या खाणाखुणा शोधत जन्म वाया घालवतात . फारच थोडे भाग्यवान "सुगंधाचा माग घ्यायला गेलो आणि सुगंधाचा हिस्साच बनून राहिलो" असे म्हणू शकतात .

ही समाधी सुखाची मूल्यवान घडी सामान्य जनांच्या दृष्टीनं वेडेपणाची एक पायरीच असते . साधक संध्याकाळच्या झाडासारखा स्वतःला तेव्हा आतून मिटवून घेतो . आत कोलाहल नसतो . पाचोळ्याशी पेलवण्यापुरताही आवाज नसतो .

कवी म्हणतो, "एका विझवणाऱ्या काजव्यासाठी जागा ठेवावीस, म्हणून ही प्रस्तावना ." (५६)

सूर्य-चंद्रांच्या पंगतीत जागा मिळणं कठीणच ! त्याच्या गाभाऱ्यात कुठंतरी एक कोपरा आपल्यालाही लाभावा - म्हणून ही प्रार्थना .

श्री . उजगरे यांचा १९७७ साली ' नवे घर ' हा पहिला काव्यसंग्रह प्रकाशित झाला . त्यानंतरचा त्यांचा प्रवास परिपक्वतेकडे जाणाराच दिसतो . 'दिपवा' हा त्यांच्या काव्यचिंतनाचा खणखणीत पुरावाच आहे ! पुस्तकाचा आकार , छपाई सारंच देखणं .

(दिपवा : निरंजन उजगरे , भावना प्रकाशन . ठाणे , ग्रंथाली वितरण , पृष्ठं ६२ . पन्नास रुपये)

**(अरविंद दोडे**

बी ८०१ , सागर आशिश , निर्लान कंपनी समोर , हायवे , ठाणे ४०० ६०४)

०००

# एका उलाघालीचा प्रवास

## अंजली कुलकर्णी

व्यवसायाने डॉक्टर असलेल्या प्रियदर्शन पोतदारांचा 'लाटांच्या आसपास' हा कविता संग्रह. डॉ. प्रियदर्शन पोतदार हे एकाच घराण्यातील चौथ्या पिढीतले कवी. कवी दत्त, वि. द. घाटे, डॉ. अनुराधा पोतद र आणि त्यानंतर तितक्याच समर्थपणे हा वारसा डॉ. प्रियदर्शननी जपला आहे हे त्यांच्या संग्रहावरून लक्षात येते.

एका विस्कटलेल्या, उद्‌ध्वस्त झालेल्या संवेदनाशील कविमनाच्या उलाघालीची असंख्य प्रतिबिंबे या कवितांत आहेत. या संग्रहातल्या कवितांच्या निर्मितीचा काळ १९६५ ते १९९४ म्हणजे जवळ जवळ ३० वर्षांचा आहे. एवढ्या मोठ्या काळाच्या पार्श्वभूमीवर असे लक्षात येते की एका विशिष्ट प्रकारच्या मानसिकतेपलिकडे कवी जात नाही. एकाच अनुभवाची अभिव्यक्ती अधिकाधिक उत्कटपणे वर्षानुवर्ष होत राहते, ही या कवितासंग्रहाची एकाच वेळेला मर्यादा आणि शक्ती आहे, कारण या एकाच अनुभवाचा शोध घेत घेत तो अधिकाधिक खोलवर आणि समृद्ध होत चालला आहे..

या उलाघालीच्या प्रवासाची सुरुवात जळत्या दुपारी 'तहानले गात्र गात्र' या सर्वसामान्य अनुभवाने होते. काही उर्मी दाटून येतात, काही अज्ञात अपेक्षा निर्माण होतात, एकटेपणाच्या कोशातून बाहेर पडून दुकटे व्हावेसे वाटते. परंतु आपण घातलेल्या सादेला अपेक्षित प्रतिसाद मिळतोय असे नाही, तेव्हा कवी लिहितो —

अनोळखीचा बांध फोडूनी
मीच वाहिलो पिउन वारा
स्वतःस हरवून बसलो, पण तू
मुळि न मोडला तुझा किनारा

परंतु ही अवस्था इथेच संपत नाही. अनुभवांचे अक्षरशः कडेच्या कडे कोसळू लागतात आणि या कडेलोटाखाली घुसमटलेपण, चेंगरलेपण अनुभवणारा कवी आयुष्यभर 'ओंजळभर वेदनेसाठी तडफडणारे गाणे' गाण्याचे व्रत घेतो.

या सर्व कविता म्हणजे एका दुःखगर्भ मनाच्या भावावस्था आहेत. त्यात मृत्यूविषयी जबरदस्त खेचक आकर्षण आहे, अनाथपण पोरकेपणाचे दुःख आहे. कवीच्या मनात स्वतःमध्ये निर्माण होत असलेल्या अनंत संभ्रमाविषयी उद्‌गार आहेत. विस्कटलेले मोडलेले घर आणि त्यातून येणारं पोरकेपण या कवितांमधून सतत भेटते. उदा.

'आईचं बोट सुटून गर्दीत चुकलेल्या
अनाथ झालेल्या असहाय्य मुलाप्रमाणे
दारोदार भटकणारं माझं आयुष्य
जे केव्हाही कुणाच्याही
पायदळी तुडवलं जाईल
आपलं घर त्याला कधीच
सापडणार नाही!

या सारख्या ओळीतून कवीला छळणारी असुरक्षिततेची जाणीव व्यक्त होते.

एका असह्य वेगाने
मुळापासून उपटलं जातंय माझं मन
त्याच्या चिंध्याचिंध्या होतात
दाही दिशांना चुकवून
अंतर्यामी तरंगत राहातात

या कवितेतून प्रचंड विस्कटलेपण, मेंदूत अनेक विस्फोट होऊन मन दुःखाच्या कणाकणांमध्ये विखुरले गेल्याचा, मनाची एकसंधता नष्ट पावल्याचा, भंगलेपणाचा अनुभव येत रहतो.

मरणओढीचे तांडव, कुणीही नसल्याची जाणीव, केव्हाही काहीही भयंकर घडू शकेल अशी अनामिक भीती, केवळ भीतीच नव्हे तर तसेच घडणार ही खात्री असल्यासारखे उद्गार येतात,

'तू एक फुंकरही मारू नकोस
कुठलं वादळ केव्हा जागं होईल
माहीत नाही.'

किंवा

पहावं लागेल कसल्यातरी
वेडानं वेभान झालेल्या
चौखूर उधळणाऱ्या घोड्यासारखं
फेसाळलेल्या तोंडचं माझं आयुष्य
कुठल्याही क्षणी जे पांगळं होईल!

मृत्यूविषयीचे ज्ञान, जगाच्या, जीवनाच्या पलिकडे काय आहे, मृत्यूनंतर काय याचे कुतूहल, अज्ञात भीती, किंचित आकर्षण हा प्रत्येकच संवेदनाशील माणसाच्या उत्सुकतेचा विषय आहे, आजवर अनेकांनी या अज्ञाताचा शोध घेण्याचा प्रयत्न निरनिराळ्या तऱ्हेने केला आहे, परंतु, जगण्यामध्ये काठोकाठ राहूनच मनुष्य या विषयाचा पाठपुरावा करीत असतो. पोतदारांच्या या कवितेमध्ये मात्र जगण्यामध्ये असूनही नसल्यासारखा कवी जणू साक्षात मृत्यूशी संवाद साधत आहे असे जाणवते.

मृत्यूशी संबंध हा अतूट आणि आकर्षक असल्याचे आणि मरण हेच साऱ्या जगण्याचे प्रयोजन असल्यासारखे कवीला वाटते. 'एक तू आणि एक मृत्यू' या ओळीतून ते व्यक्त



अनुक्रमणिका

होते.

या कवितांमधून मृत्यूविषयींची भीती, जीवन संपणार याचे दुःख व्यक्त होत नाही, उलट मृत्यूकडे एक विलक्षण आकर्षणाने उत्तरोत्तर खेचले जाण्याची तीव्रउत्कट अवस्था बहुतांश कवितांमधून व्यक्त होते व ती आपल्याला अस्वस्थ करते. इतक्या आवेगाने मृत्यूकडे झेपावत जाण्याइतके कसले दुःख कवीने पचविले असेल असे प्रश्न मनात येतात.

आणि हे सगळे असूनही एका विलक्षण तटस्थतेने कवी स्वतःच्या भावावस्थांकडे बघतो आहे, अगदी भावनारहित डोळ्यांनी स्वतःच्याच प्रेताकडे बघावे तसा काहीसा भयचकित करणारा अनुभव या कविता देतात.

या कविता वेगळ्याच रसरूपरंगगंधस्पर्शविरहित अवकाशातील पोकळीचा म्हणजेच काहीही नसलेपणाचा विलक्षण थकवणारा अनुभव देतात. स्वतःला संपूर्ण रिक्त केल्यासारखे काही उद्‌गार आपल्याला अस्वस्थ करतात. कवितेतील आशयाला अनुरूप असे एक अचेतन तत्त्व या कवितांमध्ये जाणवते. त्यातूनच अपरिहार्यपणे प्रेतात्मा, स्मशान, सावलीला आढून नेणारी रात्र, नास्तिकाच्या श्राद्धदिनासारखा दिवस, सुटकेचा उत्सव, मरणोत्सुक रात्र, मृत्यूला साक्षी असणारे दिशांचे समंध अशा टोकदार, आशयगर्भ प्रतिमा येत राहतात.

या संग्रहात प्रेमभंगाने विदीर्ण झाल्याचा अनुभव व्यक्त करणाऱ्या अनेक कविता आहेत. परंतु 'हे असेच होणार' हे आधीच ठाउक असल्याप्रमाणे त्याचे उद्‌गार आहेत. उदाहरणार्थ,

'माझ्या पारदर्शक आयुष्यात
तुझी सावली कधीच पडणार नाही.

परंतु प्रेमभंगाचे दुःख काय किंवा इतर दुःखदायक अनुभव काय. कवितेमागचे ते केवळ निमित्तकारण असल्याचे जाणवते. कवीची स्थायी वृत्तीच शोकमग्न असण्याची आहे असे वाटत राहाते.

या संग्रहात विलक्षण भावणाऱ्या कविता आहेत त्या आहेत कविताविषयक कविता.

कवीच्या बाबतीत जगणेमरणे आणि कविता हे एकरूप पावलेले आहे, किंबहुना कविता हेच खरे जगणे आहे. 'कवितेची वेळ' या कवितेत तो म्हणतो—

'कविता जागी होत असते
तेव्हाच फक्त मीही जागा असतो
तेवढेच आयुष्य असते'

किंवा

'कदाचित एक कविता' या कवितेत
'माझ्या बोथटलेल्या वेदना
कुणीतरी धार लावा
कदाचित ती धार जीवघेणी असेल
पण काळीज चिरून का होईना
एक कविता बाहेर पडेल'

तसेच

'पंख हालवून कविता
सचेतन होईल
आणि फुलासकट फुलपाखरू
उडून जाईल.'

यासारख्या ओळींतून हे जाणवते. कवीच्या शरीरमनात, संपूर्ण आयुष्यात कविता इतकी व्यापून उरली आहे की धारदार शस्त्राचे टोक मनगटाला लागले तरी कविताच त्यातून ठिबकत राहील.

इथे एक मुद्दा मांडावासा वाटतो. तो असा की पोतदारांच्या इतर कवितांमध्ये जाणवणारे रिकामपण, संपलेपण, अचेतनत्व कविताविषयक कवितांमध्ये मात्र जाणवत नाही; किंबहुना या कविता लिहिताना कवी जिवंत होतो आहे, चैतन्यमय होतो आहे असे जाणवते. म्हणूनच कविता जागी होत असते तेव्हाच मी जगत असतो हे कवीचे उद्‌गार अक्षरशः सार्थ वाटतात.

या कवितांच्या बाबतीत 'जगण्याशी प्रामाणिक', 'अनुभवाचा सच्चेपणा' असे नेहमीचे शब्दप्रयोग वापरावेसे वाटत नाहीत.

कवी जे रोज जगतो आहे असे म्हणण्यापेक्षा तो रोज जे मरतो आहे तेच त्याच्या कवितेतून ठिबकते आहे असे जाणवते. या कवितेतील दुःख आणि निराशा, दुःखवाद किंवा निराशावाद या पठडीत मोडावे असे नाही हेही जाणवते. त्यामुळेच समीक्षेचे रुढ मानदंड या कवितेच्या बाबतीत अपुरे पडतात असे वाटत रहाते.

(लाटांच्या आसपास - डॉ. प्रियदर्शन पोतदार, मौज प्रकाशन गृह, मुंबई -४, पृष्ठे १०४, साठ रुपये)

०००

## नवीन आजीव सभासद

### आळंदी देवाची

| | |
|---|---|
| बबनराव सर्जेराव धुंडरे | बबन पर्वतराव कुऱ्हाडे |
| नौपतराव फुलचंद कोलन | प्रा. विश्वनाथ दादाराव कराड |
| सौ. हेमलता शंकर शेवडे | भास्करराव एकनाथराव आव्हाड |
| विठ्ठल भा. चौधरी | मनोज चांदमल राका |
| रामभाऊ श्रीकृष्ण पेनोरे | ज्ञानेश्वर श्रीधर पाटील |
| विष्णुदास रामकृष्ण चिंद्रवार | मोहनसिंग संभाजी राजेजाधव |
| दिनेश कृष्णराव रंधवे | ज्ञानेश्वर वामनराव तापकीर |
| सुधाकर वासुदेव कुलकर्णी | पोपटलाल धनराज वडगावकर |
| अंगदराव भिकाजी केंद्रे | दत्तात्रय बाबूराव कुऱ्हाडे |
| केशवदास पंढरीनाथ कवीरबुवा | अशोक धोंडीबा रंधवे |

कोंदण : व्यंकटेश वळसंगकर

# जीवाभावाची कविता

डॉ. पंडित आवळीकर

कवी आणि त्याची कविता यांच्या अद्वैताचं व्यंकटेश वळसंगकर आणि 'काळं कोंदण' हे उदाहरण आहे. हे अद्वैत इतकं एकजीव की प्रत्यक्षातील कवी आणि शब्दबद्ध झालेली त्याची कविता यांना वेगळं काढता येऊ नये. एकाच वेळी गमतीनं आणि गंभीरपणानं बोलायचं तर या दोघांचीही असणारी अंगासरशी आकृती आणि तोळा मासा - प्रकृती आपला चिमुकलाच पण विलक्षण सजीव असा जीव आणि तेवढाच पण वरवर संथ वाटणारा भाव प्रकट करतात.

चिमुकलेपण आणि संथपण ही वैशिष्ट्यं : वैगुण्य नव्हे. वेगळेपणा हा काही वेळा मर्यादांसारखा वाटला तरी तो त्या कलाकृतींचा दोष नव्हे. स्मॉल इज ब्युटीफूल याचा आविष्कार घडविणारी लहान जीवाभावाची ही कविता मोठ्या सौंदर्यांची दर्शनं घडवू शकते. अशा कवितेकडून कसल्यातरी भलत्याच प्रचंडाची अपेक्षा करणं हा अशा कवितेतर अन्यायच होईल. व्हॉट इज ह्युज इज नॉट ग्रेट "डोळ्यातलं पाणी हुंदक्यासइ आटून गेलं. आभाळानं क्षितिज संपवलं. गाता गळ्याचा गळा घोटला. सैरमन काळ्या कोंदणात सजून राहिलं...." (काळं कोंदणं पृ.१)

ही कविता जीवाभावाची कविता आहे. तींत कवीचा जीवही आहे आणि भावही आहे. किंबहुना भाव म्हणजेच जीव. संग्रहाच्या नावातून सुचवला जाणारा दुःखभाव हा इथं कोंदणं बनला आहे. 'सुखाच्या तळ्यांत सुखच जळ, तेव्हा वरचं आभाळ निर्मळ. दुःखाच्या मळ्यांत, दुःख एकटं, तेव्हा आभाळालाही दाटून येतं..." (दुःख पृ. ३) पण त्या कोंदणात बसवला गेलेला भाव दुःख किंवा नैराश्य हा नाही. कोंदणात बसवला गेला आहे तो जीव, उपजतच निखळ, निरंजन, निर्मळ : एखाद्या झुळझुळत्या निर्झरासारखा. याला मी 'बालभाव' असं म्हटलंही असतं. हा कवी बालकवींच्या कुळीतला आहे, त्यानं आपलं बाल्य टिकवलं आहे असं म्हणत काळं कोंदण या कल्पनेचा धागा डोहकाळिम्याशी नेऊन जोडला असता, परंतु यांपैकी मी काहीच करीत नाही. हा बालजीव आहे, याबाबत माझी बालंबाल खात्री आहे. जन्मतःच दुःखाचं बाळकडू कवीला मिळालं. हे बाळकडू प्राशन करतःना सांडलेले ओघळ थेंब या चिमुकल्या पण टपोऱ्या कवितांतून चमकताना दिसतात. "पालवी भिजली की समजायचं, पालवीतून ओघळलेले थेंब, कुणाचे तरी अश्रू असतात. (थेंब पृ.९) "भिजून गळलेलं, आभाळ,

रंगगंधांनी उमललेलं फूल. एका अस्वस्थ मनाला, कुणाची अन् कशाची भूल....?" ('भूल' पृ. १३)

'थेंवावरून' मंगेश पाडगांवकरांची 'थेंव' कविता आठवली: वळसंगकरांची एकेक कविता म्हणजे एकेक विंदू आहे. पुन्हा हे सांगितलेच पाहिजे असं नाही की, विंदू आणि सिंधू यांची तुलना करू नये. फार तर एवढेच पहावे की, विंदूत सिंधू दिसू शकतो. 'विंदुस्त्रावी कवी' म्हणून कोणे एकेकाळी आधुनिक कवींची टवाळी करण्यात आली. वर सुचविल्याप्रमाणे सिंधूदर्शी लिहिणारा हा विंदुस्त्रावी कवी आहे. "ढवळू नकोस तुझा असा समुद्र तळ, एकेक शिंप वर येईल, वाहून जाईल. शिंपाविण समुद्र राहील...." ('समुद्र' पृ. २३') थेंवे थेंवे तळे साचे' या फारच वाळवोध उक्तीच्या आधारे या कवितासंग्रहास कोणी तळे म्हणू नयं.

अलिकडची वरीचशी कविता म्हणजे मोडतोड केलेलं, विघडवलेलं गद्य असतं. हृद्य गद्य हे भिकार पद्यापेक्षा वरे, तथाकथित कवितेच्या आजच्या गद्याळ जमान्यात मराठी कविता आपली चांगली 'चाल', सुखद 'वृत्त' हरवून वसलेली आहे. कोणत्याही नवशिक्यानं काव्याच्या यक्षभूमीत पाऊल टाकण्यापूर्वी वृत्तवद्ध ( गद्य का होईना ) लिहिण्याचा गृहपाठ किंवा रियाज केलाच पाहिजे, असा वटहुकूम शक्यअसेल तर या क्षेत्रातील अनभिषिक्त सम्राटांनी काढावा. एकदा हा सराव झाला की मग सर्वाथानं मुक्त लेखन त्या कवीनं करावं.

वळसंगकरांचे या वावतीतील परिश्रम माझ्या तरी पाहण्यात नाहीत. वृत्त किंवा चाल राहो; कवितेसाठी अत्यावश्यक असणारी किंवहुना प्राणभूत अशी 'लय' त्यांच्याही कवितेत मला अपेक्षित आहे.

त्यांच्या कवितेत सूचकपणानं सखीची 'सय' प्रकट होते. "केवढा मोठा डोंगर उलथला आहे मी, कौतुक करणार होतीस ना..., काय तू अंधारात सरकत जात आहेस...? ('तू-१' पृ.१९), "तुझ्या पावलांचे ठसे आता कोण पुसून गेले, रस्त्यावरील झाडांच्या कहाण्या कोण ऐकून आले? माझ्या ओठावरील शव्दपक्षी आता सैरभैर झाले..." ('पक्षी' पृ.१७) त्यांची कविता त्यामुळे लयवेल्हाळ होत नाही. कवितेत विलय किंवा प्रलय असला पाहिजे. नाहीतर हे त्यांचं जीवाभावाचं लेखन आजच्या अन्य तथाकथित कविता लेखनाप्रमाणे गद्याच्या पातळीवर राहण्याचा धोका आहे. म्हणून त्यांच्याच पुढील ओळी मी त्यांना ऐकवतो. "आभाळाच्या गाण्याला, तू तुझा सूर दे, वंचिल्या मनाला, तू तुझं गीत दे..., दुःखभार झेलताना, तू तूझा धीर दे, शव्द शव्द गुंफताना, तू तुझा साद दे..." (वाट दे पृ.२६) या धोक्यातून वळसंगकर पार पडोत आणि त्यांची कविता अल्पस्याधिकम फलम् अशा नव्या सुभाषिताची निर्मिती करायला समर्थ टरो.

(काळं कोंदणः व्यंकटेश वळसंगकर, मराठी साहित्य मंडळ, गुलवर्गा, २ पृष्ठे ५४ .वीस रुपये )

(डॉ. पंडित आवळीकर, मराठी विभाग, गुलवर्गा विश्वविद्यालय, गुलवर्गा - ५८५१०६)

०००

# प्रेमाचे उत्कट संगीत

डॉ. शंतनू वसंत चिंधडे

लंडननिवासी संमोहनतज्ज्ञ डॉ. मीना प्रभू यांचं 'माझं लंडन' हे पुस्तक गाजलं. 'सुखनिधी - तुझा माझा' हा आपला ५६ कवितांचा संग्रह त्यांनी आता पेश केला आहे.

बहुतांशी कवितांच्या केंद्रस्थानी प्रियसख्याचे प्रेम असून या प्रेमाच्या विविध छटांची गुंफण त्यांनी केली आहे. 'प्रियकर प्रेयसी' या स्तरावरच्या प्रेमापेक्षा पतिपत्नी या नात्याची दाट ओळख देणाऱ्या कविता जास्त आहेत. परस्परांवरच्या उत्कट प्रेमाची ओळख उभयतांना झालेली आहे. या ओळखीमुळे सहवासात एक धुंदी आलेली आहे. अनंगरंगाची भूल तनामनावर ओघळते आहे. अशी ही राजाराणीची जोडी सुखाच्या कुशीत आणि स्वप्नांच्या राशीत मश्गुल असतानाच पूर्वेला धूसर पहाटेच्या वेळी केशर फेकीत दिनमणी उगवतो आहे असे सुंदर चित्र कवयित्री ओळीओळीतून उभे करते. पहिल्या चुंबनाचा आनंदीआनंदही मोजक्या शब्दात प्रकट करते.

लावणी अंगाने, ठसक्यात लिहिलेल्या 'कशी' (पृष्ठ २४) या कवितेत तर प्रेमाची अगदी बहार उडलेली दिसते.

डाव्या तुझ्या दंडाची करून उशी...
अशी मी कुशीत शिरले कशी...
ओटांची मैहिरप ओठांनी कोरताना
लाजून लाजून पार चुरले कशी...!

'नारायणास्त्र' (पृ.२), 'सख्या, तुझा बोल' (पृ.२९) 'मध' (पृ. ३०) 'सनई' (पृ. ३४) इत्यादि कवितांतून प्रेमाच्या विविध परी आढळतात. सहचराविषयी कौतुकाची भावना आहे. शृंगाराचे स्पष्ट, रोखठोक वर्णन आहे. प्रेमातली तलखली, हर्ष, उल्हास, उभारी या भावनांचे कलात्मक चित्रण सर्वत्र विखरून राहिलेले आहे.

संग्रहात मोजक्याच निसर्गकविता आहेत. त्यांत वर्णन केलेला निसर्ग संपन्न, श्रीमंत, घनदाट असा नाही. निसर्गातील प्रतिमा मनातली प्रेमभावना व्यक्त करण्यापुरत्याच प्रकटतात.

झाडी डोंगरांचा हिरवा प्रवास...
हवा सहवास जिवलग...
थंडीचे दिवस मिठीत शरीर

थंडीचे दिवस मिठीत शरीर
तुझे माझे घर शय्येमध्ये . . . ! (हिरवा प्रवास, ३२)

'द्विधा मनाच्या' (५५) ही या संग्रहातली एक अप्रतिम कविता आहे. या कवितेचा आशय, विषय, वृत्त. नादमयता आनंद देते.

द्विधा मनाच्या वळणावर तव उद्ध्वस्ताची झाडे . . .
टापा उधळित स्वैर उधळती पिसाट काळे घोडे . . .
तुझ्या शांतिच्या परि काठावर रचसी सुंदर शहरे
जलाशयाच्या पृष्ठावरती वाहत झुळझुळ वारे . . . !

'तू आलास' (५७) 'सुवर्णगर्भ' (६२) 'चांदोबा' (७०) 'चेटूक' (७२) उद्गार (७९) प्रिय सख्या (८४) या कविता मुक्त शैलीत व क्वचित शब्दबंबाळ आहेत.

'तू जवळ आलास की
कुठल्याच औषधानं येऊ न शकणारी
एक नितान्त तरल गुंगी -
माझ्यावर काश्मिरी शालीसारखी पसरते. (२७)

नागीण (६१) या कवितेत कवयित्री म्हणते, "डंख मारण्यापूर्वी एक सळसळती नागीण गारुड्यालाच खेळवीत असते. त्याच्या कवितेची गारुडपुंगी पुनःपुन्हा हाती घ्यायला लावून स्वतः त्या तालावर भान हरवून नाचते. गारुड्यालाही नाचवते. अशा या जहरी प्रेमनृत्याला अुतार नाही." असे हे प्रेमातले दाहक वास्तव. वेदनांच्या वादळात (६४), हवे हवे (६७), भेट होताना एकान्ती (७१) राघू (७६), जाण्याचा दिवस (८०) नादमय छंदयुक्त रचना आहेत.

जाण्याचा दिवस अुजाडे, स्मृति मनात गोळा होती
स्पर्शाची झुरझुर गाणी . . . मिटलेल्या ओठांवरती . . . ! (८०)
किती दिसांचा अुपास गोड घासानं सुटला
सखे ओळखीचा राघू आंबराईत भेटला . . . ! (७६)
चैत्रामधला ऊन दाह अन् लखलखणारा सूर्य हवा -
रात्री शीतळ झुळझुळ वारा प्रसन्न भगवा चंद्र हवा . . . . (६७)

बऱ्याच कवितांतून काही मनस्पर्शी शब्द आढळतात. उदा. मनरमणा, दंवगाणे, ओहोटल्या लाटा, रानभुली, प्राणकांचन, इंद्रधनूची सनई इ.

येथे प्रकट होणारी स्त्री 'त्या' अर्थाने मुक्त नाही त्याचप्रमाणे ही रचना स्त्रीवादी देखील नाही. एका मनस्वी अुत्कट अभिसारिकेने प्रेमाचे हृदयसंगीत गावे असे काहीसे वाचकाला जाणवत रहाते.

मंगेश पाडगावकरांची प्रस्तावना रसाळ आहे. देखणे मुखपृष्ठ, उत्तम छपाई मोहोरेदार अक्षरे, स्वच्छ कागद असा योग या पुस्तकाबाबत जुळून आला आहे.

(सुखनिधी - तुझा माझा : मीना प्रभू, पद्मगंध प्रकाशन, पुणे ३०. पृष्ठे ५६, साठ रुपये)

(डॉ. शंतनू वसंत चिंधडे, ९/११४६ सुरश्री. लकाकि मार्ग, पुणे ४११०१६ )

००० 

# उमलून शक्य नाही मज गंध तो लपवणे

## कुमुद राळे

आरशामध्ये प्रतिबिंब बघताना आसावरी काकडे यांना आकाशच दिसते आणि त्या आसमंताचा विचार करता करता त्यांना अंतःर्मनाचा 'लाहो' म्हणजेच ध्यास लागतो. 'लाहो' हा तुकारामांच्या गाथेतला शब्द. अर्थ ध्यास हा शब्द 'आपल्यातील आंतरिक मर्यादांच्या पार होण्याच्या संदर्भात ' भावला. मनात रुजला, म्हणून 'लाहो' हे नामकरण केले असे आपल्या मनोगतात त्या म्हणतात. "मनाने अनुभवलेल्या अतिउत्कट क्षणांच्या तळाशी जाऊन पुन्हा काठावर तटस्थपणाने स्थिरावता आले तर, शब्दात व्यक्त होता येते. गेल्या तीन चार वर्षातील अशा काही क्षणांना साक्षी असलेल्या कवितांचा हा संग्रह आहे."

ह्या संग्रहात एक सलग अनुभव देणाऱ्या कविता पाठोपाठ येतात. 'मी स्वतः साक्षी आहे ! पण कळत नाहीये ही तडफड कसली?' अशी अस्वस्थता कवयित्रीला बेचैन करते . काहीतरी विस्कटते, काहीतरी वाहून जाते , पण आपण काही करू शकत नाही ही खंत उरी राहते.

एखादे व्रत घेतले की ते सोडून देता येत नाही. एखाद्या ध्येयाने मन झपाटले की ते ध्येय बाजूला करून दुसरीकडे मन वळवणे अशक्य होऊन जाते. "अथांग तंद्रीच्या डोहात गोठण्याचा वसा घेतलेल्या मला वितळता येत नाही" असे तिला वाटते.

फुले वृक्षवेली ,मेघ यांचा तिला हेवा वाटतो. त्यांच्यातल्या त्यागाचे मर्म उकलते. 'वृक्षावरचे पानन पान गळल्यावर, फूल गळून गेल्यावर, पूर्णपणे रिक्त झाल्यावरच वृक्ष पानाफुलांनी पुन्हा डवरतो.'

एकच एक वसा घेतल्याने तिला धीर येतो, सोशिकपणा आणि आत्मविश्वासही वाढतो. "खोद आणखी, धीर न सोडता आणखी खोद' असे म्हणून 'उमेदीने जगण्याला वळ लागते थोडेसे ' असे ती आत्मविश्वासाने सांगते. 'दुर्बलतेचा संदर्भ पुसून टाकला आहे' म्हणत ती गूढतेकडे वळते.

'मी आणि तू दोघांमधील संघर्षात मी पुरती वाकून जाते कावरीबावरी होते' मी ऐकलेच नाही त्याचे,' असे ती म्हणते.

राहीन एकटी मी! साहीन कोषही मी
उमलून शक्य नाही, मज गंध तो लपविणे.'

निसर्गाच्या गूढतेत शिरून क्षितीजाच्या पलिकडे पोचण्याचा ती प्रयत्न करते. त्यातूनच सुखद स्पर्श, सुखद जाणीव तिला गवसते.

'परंतु केव्हा कण मातीचा
नवा नवा वाटतो
देहामध्ये खोल रुजुनिया
आज पुन्हा जन्मतो.'

आसावरी काकडे यांच्या काही कविता छोट्या छोट्या चारपाच ओळींच्या आहेत. विषयांच्या विविधतेतून, 'मी' 'तू' च्या संवादातून, कधी स्वतःशीच बोलत, व्यथा, वेदना, अस्वस्थता, आक्रोश, खंतही व्यक्त करते. तर क्वचित प्रसंगी धीरोदात्त वृत्तीही प्रगट करते. कधी 'निर्भय मनाने पुढे जायचं आहे. जिथे सारे एकाकार असेल तिथे' असेही सुचवते. ढग, पानगळ, मातीचे अस्तित्व, उगवणे, फुटू पहाणे, गंधसुगंध अशा तरल पण सूक्ष्म कल्पनांचे वैविध्य आढळून येते. प्रत्येकाचा गर्भित, खोलवर तळ शोधण्यात त्या गुंतून जातात. आंतरिक मर्यादांच्या पुढे जाण्याचा ध्यास घेतात आणि हा ध्यास त्यांच्या संग्रहातून पुढे पुढे जाताना दिसतो. अंतःस्थाचा शोध घेत, मनाचा निर्धार करत निर्भयपणाचा आधार घेत अंतरंग खुले करतो.

अनंत आकाशातील
स्थिर - अस्थिरातून
सृष्टीच्या श्वास-निःश्वासातून
भूगर्भात उमटणाऱ्या हुंकारातून
व्यक्त होणाऱ्या अपार करुणेत
लोटून द्यायचे सारे स्रोत
एवढेच उरेल करायचं.

(लाहो : आसावरी काकडे. कॉन्टिनेंटल प्रकाशन. पुणे. पृष्ठे ९६. पन्नास रुपये)
(कुमुद गळे, ३ ए निर्मल हट सोसायटी, सेनादत्त पेठ, पुणे ३०)

०००

# स्वागत

**प्रतिमा प्रकाशन, पुणे,**

- गांधीवाद आणि आधुनिक मराठी साहित्य : संपादक - दत्तात्रय पुंडे, पृष्ठे २३२. दीडशे रुपये.
- एक वाङ्मय मर्मीक्षक : संपादक - वसंत पाटणकर, पृष्ठे २१८, दीडशे रुपये.
- अन्वय : संपादक - दत्तात्रय पुंडे, पृष्ठे १६२, ऐंशी रुपये.
- सूचींची सूची : स. ग. चुनेकर, पृष्ठे १४२, नव्वद रुपये.
- माध्यम : एस. डी. इनामदार, पृष्ठे २५४, एकशे तीस रुपये.

# मृत्यूची ओढ लागल्यावरची मानसिकता

शिवाजी आंबुलगेकर

भारतभूषण गायकवाड म्हणजे मराठवाड्यातील वाङ्मर्यान व परिवर्तनवादी चळवळीतील अस्सल मोहरा. दि. १८ जुलै, १९९५ रोजी त्यांनी आपल्या 'मित्रता' या घरी गळफास घेऊन आपली जीवनयात्रा संपविली. ते ज्या 'आविष्कार साहित्य मंडळा'चे संस्थापक होते, त्या मंडळाच्या लेटरहेडवर - 'आयुष्यात कसलाच आनंद नसल्यानं मी माझे जीवन आत्महत्या करून संपवित आहे. त्याबद्दल कोणालाही दोषी ठरविण्यात येऊ नये.' असा मजकूर लिहिला होता. मृत्यूबद्दलच्या अदम्य व अनिवार ओढीच्या खुणा 'दिशान्त'मध्ये पानोपानी दिसतात. दिशान्तमधील कविता म्हणजे मृत्यूकाव्यपत्रच होय.

१९८२ साली त्यांचा 'आयुध' हा पहिला कवितासंग्रह प्रकाशित झाला. 'दिशान्त' त्यानंतर १३ वर्षांनी.

कविता आणि आत्मचरित्र यांचा निकटचा संबंध असतो. आत्मचरित्रापेक्षाही उत्कट आणि वास्तव अनुभवांचे लयबद्ध पुंजके कवितेत असतात. भारतभूषण यांनी आत्मचरित्र लिहिण्यापेक्षा भावाभिव्यक्तीसाठी कविता हाच प्रकार हाताळला. अशा प्रकारची मरणविषयक ओढीची आत्मकविता मराठी वाङ्मयात अभावानेच आढळते. तिच्यामधून आत्म्याचे पारदर्शी दर्शन घडते.

क्रमांक ६० या कवितेचा अपवाद वगळता कवी आणि प्रिय या दोनच व्यक्तींचा वावर या संग्रहात दिसून येतो. आयुष्यात अनेक संघर्षमय घटना घडत जातात. या संघर्षातून येणारं वैफल्य, दुःख आणि त्यातून निष्पन्न होणारा अस्वस्थपणा आपल्या जवळच्या 'प्रिय'ला तो सांगत राहतो. ही 'प्रिय' व्यक्तीही दुःखाचं कारण आहे. मानवी जीवनातील दुःख हे जसं आदिम आहे, तसंच ते दिशांप्रमाणं अमर्यादही. ते हलकं करण्यासाठी किंवा त्यांचं साधारणीकरण करण्यासाठी ते कुणा तरी प्रिय व्यक्तीला सांगणं भाग असतं. ही साधारणीकरणाची प्रक्रिया, किंवा दुःखाचा आभासी अंत हे 'दिशान्त'चे वैशिष्ट्य होय.

कवीच्या आयुष्याला चिरंतन दुःखाचा वारसा आहे. धावणाऱ्या मृगजळाला तो प्रियेच्या डोळ्यातल्या आपल्या अस्तित्वाच्या खुणा विचारतो. वदत्यात आपल्या प्राणाचे

दान देऊन निःश्वासाचं गुपित उकलण्याचा प्रयत्न करतो स्वतःसंबंधी तिच्या मनाचा कौल तपासून पाहण्याचा त्याचा हा खटाटोप असतो. श्वासांनी नाकारलं तरीही तिच्या प्रेमाचा मनात खळाळून वाहणारा झरा कधीच खंडणारा नसतो. आत्मगर्भातून त्याचा स्राव हा अविरत चालू असतो. तीच कवीच्या शाश्वत आणि उदात्त प्रेमाचा धर्म आहे.

'दिशान्त 'मध्ये 'प्रिय 'च्या शारीरिक रंगारूपाचं वर्णन कुठंही आढळत नाही. पण तिचं वर्तन मात्र जाणवतं. तिचं वर्तन आणि स्वतः ती हेच त्याच्या दुःखाचं कारण होय. ती त्याची सत्त्वपरीक्षा पाहते. हृदय नसलेलं शरीर आणि शरीर नसलेलं प्रेम असे दोन पर्याय ती त्याच्यासमोर ठेवते. तिच्या प्रेमाच्या बाजूनं तो कौल देतो. प्रेमावर इतकी जबरदस्त त्याची निष्ठा आहे. त्याचं हे प्रेम इतकं स्वच्छ, नितळ, निर्मळ आहे की तो म्हणतो - 'जो कोणी त्यांचे नाते गढूळ पाण्यात शोधील त्याच्या हृदयात वाहणारे सारेच मार्ग अंधःकारानं भरून टाकीन. स्वतःचे डोळे, जीभ, कान कापून तळघरात बंदिस्त करीन.' हे सर्व कशासाठी तर तिचे अस्तित्व आपल्या बाहेर सांडू नये म्हणून.

कवितासंग्रहाच्या उत्तरार्धात सामाजिक जाणिवेचा सूर लागतो. एखादा समाजपुरुष विनोदाचा विषय होत असेल, त्याला मूर्खात काढले जात असेल किंवा समाजाच्या भल्यासाठी केलेल्या कृत्यांचा विपर्यास होत असेल तर ते नवनिर्माण कशासाठी असा प्रश्न कवीला पडतो. सारा समाजच नासला आहे. राष्ट्रयुद्धे, जातीय-धार्मिक दंगली, भूकंप, महापूर, दुष्काळ अशा मानव व निसर्गनिर्मित आपत्तीनं लोक हळहळतात. सहानुभूती व्यक्त करतात. वृत्तपत्रातल्या मदतनिधी यादीत आठवणीनं आपली नावं शोधतात. 'बरे झाले तेवढीच लोकसंख्या कमी झाली' असेही म्हणतात. प्रेतांना जाती-धर्मांची लेबलं चिटकवतात. तेव्हा कवी हतबुद्ध होतो. आपली पावलं क्रूसाकडं वळवतो. त्या क्रूसावरून ठिबकणाऱ्या रक्ताची पुढच्या क्रांतीचा इतिहास लिहिण्यासाठी शाई होईल, अशी बलिदानाची भाषा येथे आढळते. याच बलिदानातून निर्मळ झऱ्याचं मानवी युग येईल असाही आशावाद व्यक्त केला जातो.

न्यूनगंड हा कवीच्या जीवनाचा स्थायी भाव आहे. त्यातून तो भावाकुल होतो. स्वतःला दोषी मानतो. 'मी परदेशी, या रस्त्यांना माझ्या पायांचाही विटाळ' तो म्हणतो, 'कंठातून त्यांच्या डरकाळ्या फुटतात आणि मी तर यातनांचेही आवाज गमावून बसलो आहे.'

त्यांच्या नजरेत उपरे हसू हसले माझ्यासाठी
जिव्हेत त्यांच्या जहर फसफसले माझ्यासाठी
मी पसरली ओंजळ दयेची, ते मग्रूर की मी बेसूर
हरेक रस्त्यावर दिशान्त ठसठसले माझ्यासाठी.

'क्रॉम्प्रेड या देशाबद्दल', ओहोळाची धार 'आठवणी अवघड', स्वप्नं परत तील' आदी कविता लक्षणीय आहेत. तर शेवटची प्रर्दार्घ कविता गद्याकडं अधिक झुकलेली आहे.

(दिशान्त : भारतभूषण गायकवाड, इसाप प्रकाशन, नांदेड, पृष्ठे ७२, चाळीस रुपये)

(शिवाजी आंबुलगेकर, आंबुलगा. ४३१७१४ जि. नांदेड)

०००

# आदिवासी महिलेचं पहिलं आत्मकथन

प्रा. मनोहर जाधव

आदिवासी वाङ्मयात वाहरू सोनवणे, भुजंग मेश्राम इ. कवींनी आणि डॉ. गोविंद गारे, डॉ. विनायक तुमराम यांनी वैचारिक भर घातलेली आहे. तथापि गद्यलेखन तुरळक आहे.

सत्यशोधक कम्युनिस्ट पक्षाच्या कार्यकर्त्या नजूबाई गावीत यांच्या आत्मकथनाचा पहिला खंड 'आदोर' हा प्रसिद्ध झाला आहे. यापुढे रोप, लावणी, पारोळी हे खंडही येणार आहेत. परंतु यात केवळ व्यक्तिगत संदर्भ नाहीत. आदिवासींचे हे प्रातिनिधिक चित्रण आहे.

पावसाळ्याच्या तोंडावर शेतातील केरकचरा, शेण एका कोपऱ्यात गोळा करून जाळतात. ही भाजणी झाल्यानंतर शेतात भात किंवा नागलीचे बी लावले जाते. या प्रक्रियेला 'आदोर' म्हणतात. आदिवासी जीवनदर्शनातील अंतर्गत ताणतणाव आणि गुंतागुंतीची पार्श्वभूमी हे शीर्षक प्रतीकात्मकतेने प्रकट करते.

या आत्मकथनातील माणसं ही खरीखुरी आणि तीव्र रागलोभासह समरसून जीवन जगणारी आहेत. १९२० ते १९५० हा कालखंड या पुस्तकात आपल्या आईवडिलांच्या आयुष्यपटाद्वारे लेखिका मांडते.

'माझ्या आदिवासी जीवनाची कथा तपशीलवार सांगावी असं माझ्या मनात आहे. ही कथा माझ्या जन्माआधीपासून सुरू झाली आहे आणि माझ्याबरोबर ती संपेलच असं नाही. यातल्या प्रत्येक प्रसंगात अर्थातच मी नाही. पण माझ्या रक्तानात्याचे आदिवासी मात्र यात आहेत, ते जसे जगतात तसेच ते दिसावेत. मी मावची असल्यामुळे या जमातीचं चित्रण या खंडात प्राधान्याने आलं आहे. भिल्ल जमातीचं चित्रण त्यात आहेच पण कोकणी जमातीचे केवळ उल्लेख आहेत.' अशी भूमिका नजूबाईंनी प्रारंभी नमूद केली आहे आणि त्या अनुषंगाने मांडणी केलेली आहे. मेधा पाटकर यांनी प्रस्तावनेत लिहिले आहे की, 'कुठेही काही न लपवता, हातचे न राखता आपलेच जीवन उलगडताना आदिवासी समाजातल्या जीवघेण्या अंधश्रद्धाही, विषारी कंदमुळाइतक्याच सहजतेने नजूबाई उल्लेखितात तेव्हा टिपांशिवायचे हे निखळ भाष्य ठरते. शोषणाला आव्हानात्मक रंग न देता पुस्तकातील साऱ्याच्या साऱ्या घटना, नजूबाईंच्या समाजाकडे,

शोषितांकडे बघायला भाग पाडतात. तशी ताकद यात दडलेली आहे.'

नजूबाईंनी हे आत्मकथन 'अन्नाम्हणी स्त्रीमुक्ती चळवळीच्या मुड्ढणांना ही सुवार्की!' असे नमूद करून अर्पण केले आहे. सुवारकी म्हणजे सुईणीची फी. ही अर्पणपत्रिका बोलकी आहे. सद्य:स्थितीतील स्त्रीमुक्ती चळवळीच्या दिशा आणि धोरणांवर ही अर्पणपत्रिका बोट ठेवते. आजही खऱ्या अर्थाने भारतीय समाजातील स्त्री मुक्त नाही. ब्राम्हण्यग्रस्त नेतृत्वाच्या आणि संकेताच्या वर्चस्वाखाली ती वावरते आहे.

शरीराची आणि पोटाची भूक चित्रित करणाऱ्या या कलाकृतीत अन्य दलित आत्मकथनांप्रमाणे दारिद्य-शाळा-शिक्षण-प्रेम-नोकरी-विवाह असे विकाससूत्र आढळत नाही. त्याचे कारण येथील जीवनाचे विश्व आणि प्रेरणा वेगळ्या आहेत. एखादी व्यक्तिरेखा ठसठशीतपणे चित्रित होत नाही. कारण व्यक्तीऐवजी कुटुंबसमूह किंवा समाजसमूह इथे केंद्रस्थानी दिसतो. लेखिकेने कोणत्याही विशिष्ट व्यक्तीविषयी सहानुभूती नोंदवलेली नाही किंवा झुकते माप दिलेले नाही. स्पष्ट आणि स्वच्छ लिहिल्यामुळे व्यक्ती गुणदोषांसह समोर येतात. आटद्या, दूसरी, अंबू, दूसऱ्या, झिपऱ्या, आशा ही माणसे आपल्या अंगभूत वैशिष्ट्यांमुळे लक्षात राहतात आणि अस्वस्थ करतात.

'आदोर' मधील भाषा वैशिष्ट्यपूर्ण असून संवाद बोलीभाषेत तर निवेदन नागरी भाषेत आहे.

एकूण दहा प्रकरणात मांडणी केलेल्या या आत्मकथनाचे महत्त्वाचे वेगळेपण म्हणजे लेखिकेने वाचक डोळ्यासमोर ठेवून लेखन केलेलं नाही आत्ममग्न लेखनशैलीमुळे अभिनिवेशविरहित, पोझ न घेतलेले सहज गतिशील निवेदन येथे दिसते. ताटस्थ्य आणि तादात्म्य याचा सुरेख मेळ आढळतो. ॲलेक्स हॅलेच्या 'रूटस्'ची आठवण होते.

(आदोर : नजूबाई गावीत, अभिजात प्रकाशन, मुंबई-२८. पृष्ठे ११९. साठ रुपये)

(प्रा. मनोहर जाधव, एल-३९/६०३ महाराष्ट्र हाऊसिंग बोर्ड, विमानतळ रस्ता, येरवडा, पुणे ६)

---

- सप्तमहाल : आशा वळसंगकर, आशा प्रकाशन, औरंगाबाद, पृष्ठे ३६, पंचवीस रुपये.
- विभावरी शिरुरकर यांचे वाङ्मय - स्त्रीवादी आकलन : उषाताई रावसाहेब शिंदे. अमृत प्रकाशन, कळवण, जि. नाशिक, पृष्ठे ९६, एकशेवीस रुपये.
- श्वासनि:श्वास : सी. वी. दोडती, सप्तर्षी प्रकाशन, मुंबई. पृष्ठे ७३, पन्नास रुपये.
- वेडकिहाळ गावचे रामगौडा पाटील : अनुवाद, श्रेणिक अन्नदाते, सन्मती प्रकाशन. बाहुबली, पृष्ठे ५२, चाळीस रुपये.

# उभारी आणि संघर्षाची हृदयस्पर्शी कहाणी

अरुण खोरे

मराठी साहित्यात विशेषतः १९६० नंतर नवे प्रवाह, नव्या जाणिवा यांची अर्थपूर्ण भर पडली आहे. या नवनव्या प्रवाहांनी इथल्या समाजजीवनातले ताणतणाव, व्यवस्थेतील विसंगती आणि शोषित वर्गाचा कोंडमारा बोलका केला. दलित कवितेने, विद्रोही जाणिवेने समाजाला हादरवून सोडले. त्यापाठोपाठ १९७०-७५ नंतरच्या काळात दलित आत्मकथनांनी मराठी साहित्याला नवे भान दिले. या आत्मकथनांशी नाते सांगणारे एक आगळेवेगळे पुस्तक नुकतेच प्रसिद्ध झाले आहे. अपंग बांधवांमध्ये काम करणाऱ्या एका विनीच्या कार्यकर्त्याने लिहिलेल्या या पुस्तकाचे नाव आहे "थोटद्या". पोलिओमुळे पाय अधू झालेल्या रामदास म्हात्रे या तरुण आणि जिद्दीच्या कार्यकर्त्याने आपली कहाणी यात शब्दबद्ध केली आहे. शारीरिक दुबळेपणा, अपंगत्व किती अवहेलना देते, याचे सुन्न करणारे चित्रण यात आहे.

दलित आत्मकथनांशी नाते सांगणाऱ्या वंचित आणि उपेक्षितांच्या कहाण्यांच्या नव्या जगात "थोटद्या"चा समावेश करायला हवा. जातिव्यवस्थेच्या दुःखाचा, उपेक्षेचा त्याच्याशी संबंध नसला तरी अधू पायाचा माणूस म्हणून जी हीन वागणूक रामदासच्या वाट्याला येते, ती पाहताना येथील अपंग बांधवांच्या दुःखाचे वेगळेच दर्शन घडू लागते.

कोकणातील दारिद्र्य आणि निरक्षरता यांच्या संगतीत असलेल्या एका खेडेगावात रामदासचा जन्म झालेला. घरात एकूण २० माणसे. त्यातील रामदासची सात मोठी भावंडं. सर्वत्र अंधश्रद्धा आणि अडाणीपणा भरलेला. पूर्वास्पृश्यांना पाणवठ्यावर पाणी भरायला बंदी अशी सामाजिक स्थिती. या भोवतालच्या परिस्थितीमध्ये राहणारा हा मुलगा साडेपाच वर्षाचा असताना अधू पायांचा झाला. पोलिओची वार्ताच कोणाच्या गावी नव्हती. सगळेच अंधश्रद्ध. त्यामुळे रामदासच्या आईने नवस करून, देवऋषी-भगत बोलावले व बोकड कापले. लोकांच्या सूचनेप्रमाणे आपल्या मुलाचे अपंगत्व, पायाचे लुळेपण जावे म्हणून या अडाणी मायमाऊलीने सारे काही केले. त्यासाठी रामदासला शेणखाईत कंबरेपर्यंत पुरून ठेवले, नाचणीच्या कणगीत पुरले, पण अधूपण तसेच राहिले! "देवाच्या कोपामुळेच हा थोटा, लंगडा झाला" अशी गावातील साऱ्यांची समजूत झाली होती. पुढील आयुष्यातील अवहेलनेची, शिक्षणासाठी दाखविलेल्या जिद्दीची, संघर्षाची व अपंग बंधु-भगिनींच्या न्यायाची लढाई या नंतरच्या पानांत

वाचायला मिळते.

या लंगड्या मुलाला शाळेत पाठवायला त्याच्या चुलत वहिणीशिवाय कोणाची तयारी नव्हती. आपल्या या मुलामुळे शाळेत भांडणे होतील, ही आईला भीती असते, तर वडिलांना तो शिकून काही फायदा नाही, असे वाटत असते. पण लहानगा रामदास मात्र शिकायचेच या जिद्दीने पेटून उठलेला असतो. शाळा सुरू झाली तरी आई त्याला घरी आणि शेतावर कामाला पाठवीत असते. शाळा बुडाली की, दुसऱ्या दिवशी शिक्षकांकडून छडीचा मार मिळे. अशा वेळी काही शिक्षक आणि मित्र त्याच्या मागे उभे राहिल्यामुळे या मुलाचे शिक्षण सुरू होते "शिक्षण अर्धवट सोडू नका, कोणाचा गडी अथवा गुराखी वनू नका" ,या संदेशाचा त्याच्यावर परिणाम होतो. सातवीनंतर पुढील शिक्षणासाठी हा रामदास पुण्यात येतो. समाजकल्याण खात्याच्या वसतिगृहात राहून तो शिकायला लागतो. या शिक्षणातून आणि जिद्दीच्या वाटचालीतून रामदास पुढे येतो आणि त्याला समाजकल्याण खात्यात नोकरी लागते. मात्र ही कहाणी संपत नाही. अपंगांसाठी सामाजिक न्यायाचा लढा तो सुरू करतो. "जागृत अपंग संघटना" तो स्थापन करतो. अपंग संघर्ष समितीचे काम तो सुरू करतो. अपंग माणसाला लंगड्या, थोट्या, आंधळ्या, कुवड्या अशा अवमानित शब्दांनी ओळखणारे मानवी मन वदलण्याचा त्याचा हा संघर्ष आहे. अपंगांच्या प्रश्नांना वाचा फोडण्यासाठी हातात लेखणी असावी. या निर्धारामुळे रामदास पत्रकारितेचा कोर्सही पूर्ण करतो.

एका गरीव घरातील अपंग मुलाची धडपड आणि अथक परिश्रम यांच्या या कहाणीतून मनाला भेडसावणारे काही प्रश्न भेटतात. या आत्मकथनाच्या आरंभीच्या भागात "मी माणूस की जनावर" असा प्रश्न रामदासने उपस्थित केला आहे. त्याला अनुलक्षून त्याने दिलेली उदाहरणे अतिशय हादरविणारी आहेत. आपल्या दोन मित्रांसमवेत हमरापूर गावी हा जायला निघतो. त्या गावाजवळच्या गायरानात गुरे चरत असतात. हाताने चालत येणाऱ्या रामदासकडे शिंगे उगारून एक गाय धावत येते, त्याचे मित्र भीतीने पळतात, पण या विचाऱ्याला जाता येत नाही. गाय त्याच्याच मागे धावत येत असते. तो पळत राहतो. त्या गाईला हातांवर चालणारा हा मुलगा एक वेगळाच प्राणी आहे, असे वाटत असल्यामुळेच की काय ती त्याच्यामागे धावत असते. नैसर्गिक परवडीचाही प्रसंग त्याची जगण्यातील कुचंबणा स्पष्ट करतो.

अपंगत्वामुळे होणारी अवहेलना, कुचंवणा विविध स्वरूपात होते, याचे अनुभव रामदासने दिले आहेत. परीक्षा देण्यासाठी शाळेच्या फाटकापाशी आलेल्या या विद्यार्थ्याला तेथला शिपाई "ए भिकारड्या" अशी भाषा वापरतो. घरातल्या आप्तांचे, भावांचे टोमणे खाऊन आईदेखील त्याला संतापून म्हणते, "कधी एकदा तुला अवदसा घडून मरशील याची वाटच पाहातेय!" पुण्यात असताना शाळेला जाताना एका वसस्टॉपपाशी एक वाई रामदासकडे करुण भावनेने रुपयाचे नाणे फेकते ते नाणे तसेच फेकून तो बसकडे निघतो. मनाला टोचणाऱ्या या प्रसंगाने रामदास निर्धार करतो की कठीण प्रसंग आला तरी लाचार होण्यापेक्षा मरण पत्करीन. हातावर चालल्याने आपण भिकारी वाटतो, ही सामाजिक भीती त्याला ठायीठायी बोचते. महाविद्यालयात असताना

मैदानावरील खेळ पाहताना असे खेळण्याची संधी नाही, या वेदनेची नोंदही हा लेखक करतो. शेवटी तीनचाकी सायकल आल्यावर आणि अन्य सोयी मिळाल्यावर या अवहेलनेला कोठेतरी नियंत्रण बसते.

साधी, सोपी भाषा, रंगवून सांगितलेल्या आठवणी, अपंगांच्या अवहेलनेचे प्रांजळ आणि सौम्य शब्दात रेखाटलेले विविध प्रसंग आणि अपंगांसाठी सामाजिक न्यायाचे काम करणाऱ्या निर्धाराचे उच्चारण यामुळे ही आत्मकथा हृदयस्पर्शी झाली आहे.

थोर समाज कार्यकर्ते डॉ. बाबा आढाव यांनी पुस्तकाच्या प्रस्तावनेत म्हटल्याप्रमाणे "हे आत्मचरित्र रामदासचे रडगाणे नाही, तर अपंगत्वावर मात करण्यासाठी दिलेली यशस्वी टक्कर आहे", हे सर्वार्थाने पटते. मंगला खामकर या अव्यंग व सुविद्य तरुणीने रामदासशी पत्नी म्हणून त्याच्या जीवनात केलेला प्रवेश, त्याच्या सहजीवनाचे साफल्य दर्शविते.

या निमित्ताने अपंगांच्या प्रश्नांचा शोध रामदास घेतो. अपंगांना व्यासपीठ हवे, त्यांचे प्रबोधन करण्याची गरज, त्यांच्या रोजगार, पुनर्वसन आणि विवाहासारख्या प्रश्नांची तड याबाबतीत तो तपशिलाने अनेक गोष्टी नोंदवत जातो. त्यादृष्टीने या पुस्तकातील शेवटचा भाग अपंग चळवळीतील आणि सामाजिक आस्था असणाऱ्या सर्वांनीच वाचण्यासारखा आहे. शिक्षणाच्या प्रेरणांनी आपण कसे घडलो, हे रामदास आस्थेने लिहितो. त्यातून एका 'थोट्या'च्या संघर्षाची, उभारीची कहाणी स्वाभाविकपणे वैयक्तिक कोशातून बाहेर येते आणि अपंगांच्या व्यापक प्रश्नांशी, जाणिवेशी ती आपले नाते दृढ करते.

(थोट्या : रामदास म्हात्रे, सुगावा प्रकाशन, ८६/१ सदाशिव पेठ, पुणे ४११ ०३०, पृष्ठे १७९, सत्तर रुपये)

(अरुण खोरे,
तेजलकुंज सी - १४, कोथरुड, संगम प्रेससमोर, पुणे - ४११ ०२९)

०००

---

## स्वागत

- ★ **तू तर चाफेकळी :** वसंत कानेटकर, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई. पृष्ठे ९१, साठ रुपये.
- ★ **गाथा निवृत्तिनाथाची :** रावसाहेब वाघमारे, नीलकंठ रामचंद्र वाघमारे, पृष्ठे २९७, पंचाहत्तर रुपये.
- ★ **मी एक स्त्रीजातीय अस्वस्थ आत्मा :** अंजली कुलकर्णी, मानसन्मान प्रकाशन, पुणे. पृष्ठे ७२, पन्नास रुपये.
- ★ **गुड बाय मि. किंगकाँग :** माधव भावे, नवसह्याद्री, कर्वे नगर, पुणे. पृष्ठे १२४, साठ रुपये.

भ्रमाचा भोपळा : पी. बी. गुरव.

# स्वानुभवाचा आस्वाद देणाऱ्या कथा

प्रा. विश्वास जाधव

'भोवरा' आणि 'मुक्त कैदी' यानंतर 'भ्रमाचा भोपळा' हा पी. बी. गुरव यांचा कथासंग्रह, वाचकांपुढे आला आहे. कथाविषय तसे सर्वांच्या अनुभवाचे आहेत. मात्र आपले अनुभव त्रयस्थपणे टिपणे हे गुरव यांचे वैशिष्ट्य होय.

शिक्षणक्षेत्राचे आजघडीचे बाजारी स्वरूप, शिक्षणातील अडथळ्यांच्या शर्यती, बेकारीचा प्रश्न यांच्या पार्श्वभूमीवरील काही कथा आहेत. प्रभाकरचा विवाह, आईवडिलांच्या अपेक्षा, आर्थिक स्थैर्यासाठी चाललेली धडपड, ससेहोलपट, शंकरराव सोनटक्के यांची अगतिकता, ओढग्रस्तीच्या प्रपंचातील ताणतणाव 'अंधारातील कोलंबस' या कथेला पोळदार बनवतात. सुप्रिया व प्रभाकर आपल्या नजरेसमोर न येताही त्यांच्याबद्दल आपणाला सहानुभूती वाटू लागते. या कथेची शंकररावाच्या पत्राने होणारी अखेर वाचकाच्या मनात घर करून रहावी अशी लक्षणीय आहे.

पत्नीचे हळुवार मन जपण्यासाठी सदाशिवची तारेवरची कसरत चालू असते. आईवडिलांच्या मृत्यूची वार्ता तिच्यापासून लपवून, तिला तो माहेरी जायचं आहे म्हणून बरोबर घेतो. माहेर घरापुढे जमलेली माणसं पाहून तिला म्हणतो, 'धीर धर, शैला धीर धर. आपला प्रवास आता संपला आहे. पण आता इथलाही सगळा प्रवास संपला आहे.' 'संपलेला प्रवास' या कथेची अखेर अशी भावविभोर करणारी आहे.

ग्रामीण परिसरातील तोतया डॉक्टरांचा सुळसुळाट, त्यांना समाजात मिळणारी प्रतिष्ठा, त्यांचे खरे स्वरूप कळल्यावर होणारा भ्रमनिरास, विवाहसंबंधांचा फोल मुलामा यांची भांडेफोड 'टू इन वन' या मध्ये मिस्किलपणे मांडलेली आहे. आपल्या बायकोचा सिनेमाचा लडिवाळ हट्ट पुरविताना मध्यमवर्गीय भित्रेपणातून मधूची फटफजिती होते. ती 'आला अंगावर' मधून जाणवते. लग्न समारंभामधून मिरविण्याचा बायकोचा सोस 'पुरी हौस फिटली' या कथेत खुमासदार वळण घेतो. नोकरी करताना बदली अटळ असते. तरीही बदलीमुळे वाट्याला येणारे मुलखावेगळे शेजारी, बायकांच्या स्वभावाचे नमुने, द्वेष - असुया, राग-लोभ, कौतुक अशा भावछटांचे दर्शन आणि शहाण्यांच्यासारखं वागायचं नाही म्हणून घर बदलण्याच्या निर्णयाप्रत पोचलेला नायक 'नवी वाट' मध्ये भेटतो.

मुलाचे पाय पाळण्यात दिसतात या न्यायाने आपला तुका पुढे गावाला गरागरा

फिरवणार, तो हिकमती होणार, पुढे कुठे तरी आमदार होणार म्हणून त्याच्या गुंडगिरीवर आणि वात्रटपणावर पांघरुण घालणारा सरपंच वाप, मस्तवालपणे जगणारा त्याचा वेरकी मुलगा, मुलाच्या वेफिकीर वागण्याची काळजी वाटणारी वत्सल आई यांचे चित्रण 'दिलासा' तून मांडले आहे. ते वाचताना आपण आपल्याही न कळत 'तुकाचे' होऊन जातो.

शिक्षणक्षेत्रासारख्या तीर्थक्षेत्राची बाजारपेठ करणारे तात्या तोडकरसारखे लोक आणि त्यांना पोसणारे हितसंबंधी लोकांचे मौन 'भुजंग'ला स्फोटक कथाबीज पुरवते. नोकरीसाठी दिलेल्या रकमेची वसुली करण्यासाठी तोडकर मास्तर शाळेच्या नावावर तमाशाची कंत्राटे घेतात. मुलींना फशी पाडण्यासाठी नाना लटपटी करतात. त्यांच्या आदर्शवादाच्या बुरख्याचे वस्त्रहरण हेडमास्तर करतात. त्यांच्या संघर्षाचे चित्र 'भुजंग' मध्ये पहावयास मिळते.

लेखकमहाशय म्हणून मिरविण्याची सुर्वे मास्तरांची हौस असते. त्यांच्या सहकाऱ्यांच्या अपेक्षा एका पाठोपाठ एक भुईसपाट होतात आणि सुर्व्यांचे स्त्रीलंपट रूप समोर येते. त्या अपेक्षाभंगाने सुर्वे यांच्या बद्दलच्या भ्रमाचा भोपळा फुटतो. सर्वच लेखक असे ढोंगी, तकलादू, उथळ असतात असे गुरव यांचे मत असल्यास अर्थात ते भ्रममूलक व चुकीचे म्हणावे लागेल. एकूणच मानवी जीवनावद्दल, गुणदोषावद्दल गुरव अगदी ढोवळ आकलन दाखवतात.

काहीजण हौसेने लिहितात, काहीजणांचे लिहिणे हौसेखातर असते. गुरव यांच्या कथा तुमच्या आमच्या अनुभवांचा आधार घेतात; त्या आपल्या कथा त्या पातळीवर वाटतात हेच या कथासंग्रहाचे वेगळेपण.

(भ्रमाचा भोपळा : पी. वी. गुरव, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे ३०. पृष्ठे १०१, साठ रुपये)

(प्रा. विश्वास दा. जाधव, बळवंत महाविद्यालय, विटा ४१५ ३११)

०००

## नवीन आजीव सदस्य

### आळंदी देवाची

श्रीकांत भिकाजी चितळे
सौ. प्रतिभा सुरेश सोनावणे
सौ. सुनिता सदानंद शेडवाळकर
डॉ. सुरेश गोविंद घैसास
मंगेश तुळशीराम कराड
वावासाहेब ज्ञानेश्वर पाचुंदे
डॉ. दिगंवर कोडप
श्रीधर नारायण कुऱ्हाडे
श्रीकृष्ण जगन्नाथ भिडे
तुकाराम रामचंद्र चव्हाण
सौ. विपुला सारंग जोशी
सौ. सुमन लक्ष्मण कंकाळ
सौ. छाया दादासाहेब गायकवाड
अशोक बावूराव उमरगेकर
सुभाष रामचंद्र नाश्करे
श्रीधर शामराव पाटील
डॉ. अरविंद अनंत कुलकर्णी
गणपतराव तुकाराम येळवंडे
मुकुंद अनंत चावरे
रामचंद्र नागेश गोहाड
उत्तम बबनराव गोगावले

# पूर्वग्रह, परंपरा, आदर्श यांचे वलय भेदण्याची उर्मी

प्रा. अपर्णा चंद्रस

'शोध', 'प्रतीती', 'ओळख' याप्रमाणेच कथालेखिका सानिया यांचा 'वलय' हा संग्रह स्त्रीजीवन, माणसामाणसांतील मैत्र, नातेसंबंध, संवाद ह्यांचा शोध घेतो. वलय छेदून आत जाऊ पाहणाऱ्या स्त्रीचे छायाचित्र असलेल्या मुखपृष्ठापासून या संग्रहाला खरा आरंभ होतो. हे वलय पूर्वग्रहांचे, परंपरेचे, स्वप्नाचे किंवा वेगडी कल्पनांचे असते. ते छेदण्याची धडपड करणारी स्त्री स्व:तःचा व वलयातील खऱ्याखुऱ्या माणसाचा शोध घेते. अस्तित्ववादी, जीवनवादी तत्त्व ज्ञान सांगणाऱ्या नऊ कथांचे हे वलय आहे.

इतरांना भारून टाकणारे झगझगीत वलय असणाऱ्या व्यक्तीच्या दीर्घकाळ सहवासात आलेली माणसे नंतर दूर गेली तरी त्या प्रभावातून बाहेर येत नाहीत.

ललिताच्या पतीला-अशोकला हरिहरांनी वाढवले, नोकरी देऊन स्थिर केले. त्यांचे अशोकला हरकाम्यासारखे वागवणे, पाणउतारा करणे पाहून ललिताला त्यांच्या घरात सतत आश्रितासारखे वाटते. अशोकच्या मृत्यूनंतर ललिता हे संबंध संपवते. दहा-बारा वर्षांनंतर थकलेल्या हरिहरांना अचानकपणे घरी आलेले पाहून ती चकित होते. वस्तुस्थितीचा तटस्थपणे विचार करून पूर्वग्रहाचे वलय ती तोडते. संवेदनशीलता, हळवेपणा स्त्री-पुरुष असा भेद वयपरत्वे येणारी मृत्यूबद्दलची भीती करत नाही हे जाणवते.

भिन्न व्यक्तिमत्त्वाची माणसे एका छपराखाली राहतात तेव्हा त्यांना एकत्र बांधणाऱ्या घराच्या साक्षीने परस्परांचे दोष टाळून माया करतात. वर्तनाला स्वच्छंदीपणाचे, मुक्ततेचे वलय असलेल्या गौरीवर अनिल तर फिदा होतोच पण केवळ गृहकृत्यात धन्यता मानणाऱ्या छबूताईही तिच्याशी संवाद साधण्याचा प्रयत्न 'घर' मध्ये करतात. जीवनात दु:खी एकाकी असणारी उत्तरा रोहिणीच्या मैत्रीच्या आधारावर जगण्याचा यशस्वी प्रयत्न करते. आर्थिकदृष्ट्या स्वतंत्र असूनही हा तिचा प्रयत्न असफल होतो. आपला मुखवटा ती फेकून देऊ शकत नाही. आणि आयुष्याचाच खेळ करून बसते. जीवनविषयक 'रीती' कसोशीने पाळणारे कुटुंब सुसंस्कारांच्या वर आधारित असणारा पाया सोयीस्करपणे तोडून टाकून भ्रष्टाचाराचेच तत्त्वज्ञान बनविते. ह्यातून कुमार-अरुणाच्या जीवनशैलीचा वेगळेपणा जाणवतो.

सारेच निरर्थक, भंकस वाटणारा सुदर्शन आजच्या युवापिढीचा प्रतिनिधी आहे.

त्याची आई सुद्धा मुद्देसूद युक्तिवाद करणारी कर्तबगार आहे. तिची मैत्रीण मीराची मुलगी सुचेता सुधापेक्षाही अधिक बुद्धिवादी असून सुदर्शनचे प्रेम ती सहजतेने डावलते. स्त्रीपणाचे किंवा पुरुषपणाचे ओझे व दुःख वाटणे हे दोघांमधील साम्य. दोघांनाही निखळ माणूस म्हणून जगायचे आहे. यातूनच मंद जाईचे निरागस, बालिश पण खरे जग सुदर्शनाला जवळचे वाटते.

'चौकट'मध्ये एका कुटुंबातील चौघांचे जीवनाकडे पाहण्याचे भिन्न दृष्टिकोन दिसतात. गुणाधिष्ठित करिअर करावे, पैसा मिळवावा असे मानणारी आरती. करिअरिस्ट होण्याने जीवनाला पूर्णता येतेच असे नव्हे हे उमगलेले अप्पा मुलीपेक्षा मुलाला जास्त शिकवायचे ही रूढ चौकट मोडतात. वस्तुस्थितीशी तडजोड करणारा संदीप हा दुसरा कोन. ही दोन टोके संदीपची पत्नी आणि अप्पा हे ह्या समोरासमोरच्या कोनांना जोडणारे कोन. अप्पा मुलीमध्ये मुलाला व मुलाला मुलीमध्ये पाहतात.

'नाती' मधील नाटककार श्रीनिवासांचा मुलगा निरंजन रियाधला नोकरीसाठी गेलेला असून सून अदिती शाळेत नोकरी करत त्यांच्याजवळ राहते. अदितीपेक्षा पलीकडे राहणाऱ्या लक्ष्मीबद्दल त्यांना आपुलकी आहे. अदिती गेली तर आपल्या भवितव्याविषयी साशंक असल्याने वारंवार तो विषय काढून मनातील शंका फेडण्याचा प्रयत्न करतात. अवचितपणे त्यांचा एकाकीपणा, असहायता, स्वतःही त्याच अवस्थेतून जात असल्याने अदितीला जाणवतो व ती रियाधला न जाण्याचा निर्णय घेते. लादलेल्या नात्यापेक्षा मनातून फुलून आलेले नाते व्यक्तीला नवे बळ देते.

संवाद प्रस्थापित करण्यासाठी धडपडणाऱ्या निवृत्त वृद्धाचे अनोखे चित्रण 'माधवी' या कथेत आहे. प्रत्येकाच्या मनात कोवळ्या वयात एक प्रतिमा ठसते. जीवनाच्या धकाधकीत तिची आठवण बुजल्यासारखी वाटते. एकाकीपणात ती उफाळून येते. वास्तवाचे, रखरखीतपणाचे चटके बसल्यावर ती भंग पावते. हे अनुभवणारे श्रीनाथ माधवीची प्रत्यक्षातली प्रतिमा - शशी हिला आपुलकी देतात. बदल्यात पित्याची विशुद्ध भावना मिळवून तृप्त होतात. 'अर्थ' मध्ये पती-पत्नीमधील सुसंवाद, गाढ प्रेम, विश्वास मृत्यूवर मात करतो हे उमगते. केदारच्या मृत्यूमुळे केदार-रमाच्या नात्याला पूर्णविराम मिळत नाही. मृत्यूमुळे माणूस संपतो, नाते नाही. कॅन्सरशी झुंज देतानाही केदारने रमाला जे दिले त्यामुळे तिचे संपूर्ण आयुष्य संपन्न झाले. कादंबरीप्रमाणे छोट्या अकरा भागांमधील ही दीर्घकथा बहुकेंद्री नाही. केदारच्या रूपागुणांवर प्रेम करणारा सुसंस्कृत निर्मळ प्रथम कचरतो पण केदारच्या आठवणीने तसाच ताठ, सहज होतो व रमाला अंतर न देण्याचे ठरवितो. एरवी कथा इथून चालू होते पण सानिया कथेमागची कथा शोधत थेट अंतर्मनाचा तळ शोधतात.

सानियांच्या कथांमध्ये आशयाची विविधता असून हे अनुभव मांडण्याची त्यांची ताकद लक्षात येते. गंभीर, वैचारिक, अंतर्मुखतेकडे वळणारे लेखन असूनही कवितेप्रमाणे सूचकगुणाने मंडित आहे. आपापल्या मगदुराप्रमाणे वाचकाला त्यातून वेगवेगळे संदर्भ प्रतीत होतील.

(वलय : सानिया. ज्ञानदा पब्लिकेशन्स, पुणे. पृष्ठे २२३. शंभर रुपये)

(प्रा. अपर्णा चंद्रस, सुपर डी ४/३ दीपनगर, भुसावळ)

०००

# नाट्यपूर्ण अनुभवांवर भर देणाऱ्या कथा

डॉ. वसंत बडवे

प्रल्हाद वडेर यांच्या 'रक्तखुणा' मधील वहुतेक कथांचा विषय मानवी अंतःकरणातील 'व्यथा किंवा वेदना' हा आहे. या व्यथा-वेदना मुख्य पात्रांच्या जशा आहेत, तशा त्या लेखकाच्या अतंःकरणातीलही असाव्यात. 'व्यथाः एका कथेची' ही त्या दृष्टीने प्रातिनिधिक कथा म्हणता येईल. तिचा नायक एक लेखकच असतो. त्याला कथा लिहायची असते पण प्रत्यक्षात ती कागदावर उतरत नसते. त्यांच्याकडे कथाबीज नसते किंवा कथा अजिवात सुचत नसते असे नव्हे. उदा. .... त्याच्या अवतीभोवती पात्रंच दिसू लागतात. 'माझी गोष्ट लिहा', 'माझ्यावर लिही' असं ती म्हणू लागतात. एक म्हातारा म्हणतो की, मला मुलांनी टाकलंय... मी आता म्हातारपणी कसं जगावं, हे सांग दुसरी एक स्त्री लगेच त्याला वाजूला सारून पुढं येते आणि म्हणते की, 'मी त्या समोरच्या माणसावर प्रेम करते पण तो विवाहित आहे.' दुसऱ्या कुण्या एका माणसाची लेखकाला तेवढ्यात आठवण होते. त्यानं स्वतःला कोंडून घेऊन आत्महत्या केलेली असते. तो ती कहाणी सांगू लागतो. म्हणजे दुःखाची, वेदनेचीच कहाणी होऊ शकते असे त्या लेखक-नायकाला वाटत असणार. लेखक-नायक नंतर जी गोष्ट सांगतो ती एका फसलेल्या तरुणींची, तिच्या आत्महत्येची आणि अकाली जन्मलेल्या तिच्या मृत वालकाचीच असते.

या व्यथा-वेदनांचा उगम कधी वैफल्ययुक्त अनुभवात असेल, कधी निराशेतून होणाऱ्या आत्महत्येचा स्वरूपात तो व्यक्त होईल, कधी मत्सरी स्वभावामुळे घडणाऱ्या हिंसक घटनेत तो प्रकट होईल, कधी असहाय्य दारिद्यामुळे भोगाव्या लागणाऱ्या हालअपेष्टा सहन करण्यामध्ये त्याची प्रचीती येईल. कधी मृगजळाप्रमाणे स्वप्नसृष्टीच्या मागे लागल्यामुळे नैराश्य पदरी पडेल.

उदा. 'ग्रँड रिडक्शन सेल' या कथेतील सत्यव्रत पण दरिद्री प्राध्यापक आणि त्याच्या स्वाभिमानाची होणारी परवड आणि त्यातून उद्भवलेले हताशपण. 'रक्तखुणा' मधील एका भ्रष्ट सरकारी उच्च अधिकाऱ्याचे आणीवाणीच्या काळातील वर्तन, पण अशा खलपुरुषाचा सुद्धा जेव्हा अंदाज चुकतो तेव्हा होणारी त्याची चडफड आणि त्याचे भक्ष्य झालेल्या स्त्रीची आत्महत्या, 'पार्टी' मधील नायक आपल्या मित्राच्याच मत्सराचे लक्ष्य होतो त्यामुळे त्याचा विषादयुक्त अनुभव त्याच्या शारीरिक जखमांइतकाच वेदनाकारक

असतो. 'सांजसावल्या' मधील कॅथॉलिक ग्रँडमा आप्तेष्टांच्या गोतावळ्यात आपल्याला मरण येणार नाही या विचाराने व्यथित होऊन आत्महत्येला प्रवृत्त होते. 'परगोला'चा नायक पत्नीच्या चारित्र्याच्या संशयाने ग्रासलेला असतो. 'न इथली-न तिथली' या कथेची नायिका परंपरा व आधुनिकता यांच्या समन्वय न साधल्याने फसते.

वडेर यांनी कथालेखन सुरू केले तो काळ मराठी वाङ्मयेतिहासातील संधिकाळ होता. 'जुनी कथा' आणि 'नवी कथा' या सीमारेषेवर कुठेतरी ही कथा स्थिर आहे. त्यांच्या कथांचा आशय खांडेकरी संप्रदायातला तर भाषाशैली फडके संप्रदायाची वाटते. कथन-तंत्रामधील प्रयोग नवकथेला जवळचे वाटतात. मनोविश्लेषणात्मक पद्धतीने पात्रांच्या वर्तनाचा वेध घेतात, पात्रांच्या अंतर्मनातील टोचणारा एखादा लस असतो, त्याचा धागा पकडून वडेर कथेला सुरुवात करतात. वर्तमानकाळात सुरू झालेली कथा मग भूत-वर्तमान अशी मागेपुढे होत राहाते, कथनाचा हा भाग संक्षिप्त वर्णन व अर्थपूर्ण उपमा-उत्प्रेक्षा यांनी व्यापलेला असतो, आणि सुमारे तीनचतुर्थांश कथा-क्रम ओलांडल्यानंतर कथा एका कळीच्या प्रसंगावर येऊन ठेपते. हा कळीचा प्रसंग हाच कथेचा उत्कर्षबिंदू असतो. याच टप्प्यावर त्या अंतःकरणाला टोचणाऱ्या लसीचा उलगडा होतो, वाचकाला त्या क्षणी कथेला आशय भावतो आणि कथा संपते. त्यांचा कथन-तंत्राचा हा आलेख बहुतेक कथांबाबत जाणवतो.

संग्रहातील 'न्यूड' ही सर्वोत्कृष्ट कथा आहे. प्राध्यापकांचे पिकनिक, निसर्गरम्य गोव्याचा परिसर, विशेषतः सुवर्णरेतीचा समुद्र किनारा आणि या किनाऱ्यावर व समुद्रात स्वच्छंद वावरणाऱ्या हिप्पींचे फिरणे, बागडणे, त्यावरील प्राध्यापकीय आकर्षण आणि असुया अशा मिश्र स्वरूपाच्या प्रतिक्रिया, एवढ्यात तीन-चतुर्थांश कथा संपते आणि कळीचा प्रसंग येतो. एका सुंदर हिप्पी तरुणीची दरवाजाच्या चौकटीत उभी पूर्ण विवस्त्र असलेली, आजूबाजूच्या जगाचे अजिवात भान नसलेली, चित्रमय प्रतिमा समोर येते. या क्षणी लेखक त्या 'न्यूड'चे वर्णन करण्याच्या फंदात पडत नाही, फक्त त्या चित्राचा प्राध्यापक मंडळीवर काय प्रभाव पडला हे सांगतो आणि कथा संपते. ही कथा अतिशय संयमाने लिहिली आहे. त्या चित्राचा जो प्रभाव पडतो त्याचे वर्णन 'स्तिमित' होणे एवढेच करता येईल. कधीकाळी या देशात गोऱ्या कातडीचा मनुष्य आल्यावर आणि त्याला पाहिल्यावर हिंदवासीयांना वाटले की तो रामभक्त हनुमान याचाच वंशज असावा. सीतामाईच्या आर्शीवादाने तो कलियुगात आपल्यावर राज्य करण्यासाठी आला असावा. त्याला शेपूट सुद्धा असावे असे म्हटले जायचे. विसाव्या शतकाच्या या उत्तरार्धात हाच गोरा माणूस आणि त्याच्या स्त्रिया गोव्याच्या समुद्र किनाऱ्यावर नग्न वावरत होत्या. जणू त्यांना शेपूट आहे की नाही हे पाहण्याची हिंदवासियांना संधी आलेली होती. ते 'न्यूड' त्याचे प्रतीक होते. आणि अजूनही आपला हिंदवासी ते दृश्य पाहून केवळ 'स्तिमित' होत होता! त्याला शब्दसुद्धा फुटत नव्हता.

वडेर हे जुन्या नव्या कथावाङ्मयातील संधिकालातले लेखक आहेत. काही कथा जुन्या संप्रदायातील वाटाव्यात अशा आहेत. उदा. 'रॅगिंग'चा विषय आधुनिक वाटला तरी त्याची हाताळणी जुन्या पद्धतीची 'बोधप्रद' वळणाची आहे. तसेच 'संध्याकाळी

...तळ्याकाठी', 'धुकं' आणि 'स्वप्न' या कथांमध्ये 'तो', 'ती' व 'तिसरे कुणीतरी' हा त्रिकोण आहे.

वडेर हे एक साक्षेपी अभ्यासक व लेखक आहेत. कल्पनाशक्तीचे व भाषाशैलीचे त्यांना देणे आहे हे या संग्रहावरून लक्षात येते.

(रक्तखुणा : प्रल्हाद वडेर, स्नेहवर्धन प्रकाशन, पुणे. पृष्ठे ८८, पंचेचाळीस रुपये)

(डॉ. वसंत वडवे. बी - १४, दिप्ती पॅलेस, न्यू पॅलेस रोड, कोल्हापूर ४१६००३)

०००

---

## वसंत देव

ख्यातनाम साहित्यिक व मराठीतील उत्तमोत्तम साहित्याची हिंदीला ओळख करून देणारे ज्येष्ठ अनुवादक डॉ. वसंत देव यांचे २४ जानेवारी १९९६ रोजी बॉम्बे इस्पितळात हृदयविकाराच्या झटक्याने निधन झाले. ते ६७ वर्षांचे होते.

'दिखती ही नहीं अपनी छाँव' हा काव्यसंग्रह व 'अरण्यकिरण' हा गद्यपद्यसंग्रह यासारख्या स्वतंत्र लेखनाबरोबच डॉ. देव यांनी पु. ल. देशपांडे, आचार्य अत्रे, वसंत कानेटकर, विजय तेंडुलकर, महेश एलकुंचवार, गो. पु. देशपांडे, श्याम मनोहर, चेतन दातार आदींची अनेक नाटके अनुवादाद्वारे हिंदी रंगमंचावर नेली. तसेच ज्ञानेश्वरांपासून ते थेट दलित कवींच्या कवितांची ओळखही हिंदी वाचकाला करून दिली.

घाशीराम कोतवाल, आरण्यक, कमला, बेबी, कन्यादान अशा वादग्रस्त मराठी नाटकांची ओळख डॉ. देव यांच्यामुळेच हिंदी रंगमंचाला झाली आणि या हिंदी नाटकांचे शेकडो प्रयोग भारतात झाले. पण केवळ अनुवादक एवढेच काही त्यांचे साहित्याशी नाते नव्हते. श्री. दा. पानवलकर यांच्या कथेवर आधारित 'अर्धसत्य' या चित्रपटाचे संवादलेखन डॉ. देव यांनी केले होते. गाजलेल्या 'उत्सव' या हिंदी चित्रपटातील गीतांबद्दल त्यांना 'फिल्मफेअर पुरस्कार' तर 'सारांश' मधील गीतांसाठी राष्ट्रीय पुरस्कार मिळाला होता.

आताच्या मध्य प्रदेशातील झाशीमध्ये जन्मलेल्या डॉ. देव यांचे सर्व शिक्षण तेथेच झाले. तेथे सरकारी खात्यात त्यांनी अधिकारपदावरील कामही केले; परंतु हिंदी भाषा व काव्य यांच्या प्रेमातून ते मुंबईला आले. येथे आल्यावर हिंदी राष्ट्रभाषा प्रचार समितीच्या कामात त्यांनी स्वतःला गुंतवून घेतले. माटुंग्याच्या रुपारेल महाविद्यालयात १९५५ ते १९६० अशी पाच वर्षे अध्यापन केल्यानंतर त्यांनी पार्ले महाविद्यालयात अध्यापनाचे काम सुरू केले. तेथूनच १९८९ साली ते उपप्राचार्यपदावरून निवृत्त झाले.

उत्तर प्रदेश सरकारचा आचार्य आनंदऋषी साहित्य पुरस्कार, नेथील हिंदी भाषा संस्थानचा पुरस्कार, तेथील हिंदी भाषा संस्थानचा पुरस्कार तसेच महाराष्ट्र राज्य हिंदी अकादमीचा पुरस्कार आदींद्वारे त्यांचा व त्यांच्या साहित्याचा गौरव झाला आहे. मराठी साहित्य हिंदीत नेताना त्याचा आशय टिकवून ठेवण्यासाठी त्यांची धडपड असे; पण आशय टिकविताना हिंदी भाषेची गुणविशेषता, शब्दांची चपखलता यांचेही कायम भान राखले. त्यामुळे त्यांनी केलेली अनुवादही स्वतंत्र लिखाणाइतकेच श्रेष्ठ वाटत.

त्यांना आमची भावपूर्ण श्रद्धांजली.

# सन १९९५ मधील निवडक पुस्तके

१९९५ साली पहिल्या आवृत्तीची सुमारे एक हजार पुस्तके प्रकाशित झाली असावी. त्यापैकी काही निवडक पुस्तकांची यादी चोखंदळ वाचकांच्या व ग्रंथपालांच्या माहितीसाठी येथे देत आहे. ही यादी अपूर्ण आहे. या यादीत आपल्या मोर्यानुसार ज्याची त्याला भर घालता येईल. नवीन निघणाऱ्या पुस्तकांची नोंद घेऊन त्यांची यादी ललित व साहित्यसूची ही मासिके प्रसिद्ध करतात. ती उपयुक्त असते. परंतु त्या यादीतही बरीच अपूर्णता राहते. अधिक साक्षेपाने हे काम करणारी यंत्रणा तयार व्हायला हवी - संपादक

कादंबरी

एक होती आजी : श्री. ना. पेंडसे
दुःखाचे श्वापद : रंगनाथ पठारे
दशक्रिया : बाबा भांड
मी अजून जिवंत आहे : किशोर रणदिवे
आपरेशन एअरक्रॅश: कल्पना गोसावी देसाई
त्रिमाकार्सी मादाम : अनंत सामंत
वारस : इंद्रायणी सावकार
वोमदिला : अविनाश बिनीवाले
अंतर्जीची वखर : नंदा खरे
अंधाराच्या पारंब्या : जयवंत दळवी
अवकाशाशी जडले नाते : अनु. नारायण धारप
अंतरंग : विजया वाड
वंदे मातरम् : मदन पाटील
स्वप्नछाया : मुकुंद वापट
शुभमंगल : अनु. अरुण माधु
विजयनगर : जनार्दन ओक
संभव : माधव चव्हाण
सरकारनामा : अजय झणकर
जन्मटेप : रामचंद्र सडेकर
सामना : शिवराज गोर्ले
पिंड : उत्तम वंडू तुपे
मंत्रमुग्ध : प्रकाश यादवाडकर
निष्कर्ष : डॉ. नितिन लवंगारे
अ-संवादी : आनंद थत्ते
जागरी : सतीनाथ भादुडी, अनु. शंकर सारडा
चिरेबंद : रवींद्र शोभणे
भगवान : राम सराफ
गोकुळचा चोर : वि. य. कुलकर्णी
पब्लिक : जनार्दन ओक
संकल्प : राजा यावलीकर
समाधी : शुभांगी भडभडे
परतुनी ये घनश्याम : दिनकर जोशी
डायरी एका पुरुषाची : द्वारकानाथ नेरूरकर
उन्हातील चांदणे : सुरेश पोरे
कापुराच्या वाती : अनंत मनोहर
अंतर्हीन : संजय कळसकर
खुळखुळा : व. वा. बोधे

मानदंड : ग. अ. फडके
पखाल : बाबाराव मुसळे
फरफट : अण्णासाहेब देशमुख
एक पिसाचा मोर : मालती मराठे
आरण्यक व कोहम् : लक्ष्मण लोंढे
अग्निकाष्ठ : बाबू बिरादार
अविभाज्य : शंकर इनामदार
सव्वीस दिवस : रवींद्र शोभणे
विलामत : दिनकर दाभाडे

**कथा**

काठ : सिसिलिया कार्व्हालो
चतुरंग : दिलीप पु. चित्रे
पितापुत्र : वसंत नरहर फेणे
ज्याचा त्याचा क्रूस : वसंत नरहर फेणे
वलय : सानिया
मदारी : संतोष वरधावे
अज्ञात झऱ्यावर रात्री : अरुणा ढेरे
अंश : रत्नाकर मतकरी
आदिम : रेखा बैजल
चांदणफुला : सुमेध वडावाला
भ्रमाचा भोपळा : पी. वी. गुरव
भूमिका : अनुराधा वैद्य
विनोदी कथा : वि. वा. शिरवाडकर
देहभोग : माधव नसकुलकर
आगराळ : चंद्रकुमार नलगे
आदर्श : मारुती यादव
कणसं आणि कडवा : रा. रं. बोराडे
महालूट : सदानंद देशमुख
भाऊ पाध्ये यांच्या श्रेष्ठ कथा : सं. दिलीप चित्रे
पूर्वा : दुर्गा भागवत
एक गाणे चुलीचे : शांता शेळके
सोहळा : जयवंत दळवी
धुमारे : माधवी देसाई
फौजी : विनय वाईकर

पंख : अनुराधा वैद्य
वर्तुळ : बशीर मुजावर

**कविता**

संध्यपर्वातील वैष्णवी : ग्रेस
वियोगब्रम्ह : रा. ग. जाधव
निरंजन : अरुणा ढेरे
पूर्वसंध्या : शांता शेळके
त्रिवेणी : मंगेश पाडगावकर
लाहो : आसावरी काकडे
शुकशकुन : नरेंद्र बोडके
ध्यानस्थ : प्रवीण दवणे
रात्र गहिरीच्या : अविनाश धर्माधिकारी
दिपवा : निरंजन उजगरे
मन सोनपक्षी : अरुण सावळीकर
काहिलीचे पाणी : आनंद जोर्वेकर
तुझे तुला माझे मला : टी. एन. परदेशी
अंतर्नाद : अरविंद भुजबळ
कवुली : संतोष पवार
अंधार : भीमराव उबाळे
अनाहत : सुधांशु
हसरा ॠतू : प्रकाश पठारे
मी एक स्त्रीजातीय आत्मा : अंजली कुलकर्णी

**ललित**

जाणता अजाणता : शांता शेळके
तेजाची पावले : फ्रान्सिस दिब्रिटो
याद सताये : वामन चोरघडे
चंद्रावेगळं चांदणं : विजय पाडळकर
गावाकडच्या गजाली : मधु मंगेश कर्णिक
सकाळचे ऊन : बाळ गाडगीळ
माणसं : व. पु. काळे
टिप फुले टिप ग : शिरीष पै

व्रात्यस्तोम : शांताराम
रसिकहो : पु. ल. देशपांडे
मित्र हो : पु. ल. देशपांडे
प्रकृतिपौरुषेय : अनिल / शायली दामाडे
गुडवाय मि. किंगकाँग : माधव भावे
तारकांचे गाणे : वावू मोशाय
दवातले थेंब : विलास पाटील
शब्दलहरी : अनुराधा फाटक
चिमाजीआप्पा पुणेकर : अनंत गाडगीळ
दृष्टिक्षेप : माधव गडकरी
पासंगः दया पवार

**प्रवास**

यात्रा : कुमार सप्तर्षी
नवलाई : राजेंद्र वनहट्टी
रूक्ष भूमीतून यक्षभूमीत : उषा पाणंदीकर
स्वप्नांच्या सापळ्यांचा देश : कुमार सप्तर्षी
नैनी डेज : सुमेधा कामत
मंडेलाच्या देशात : विजय नाईक

**चरित्रे**

हिटलर : बाळ सामंत
हेमिंग्वे : आशा कर्दळे
सूर्यकोटिसमप्रभ : माधव साखरदांडे
तर्कतीर्थ : अरुंधती खंडकर
लता मंगेशकर : राजू भारतन
लता दिदी : हरीश भिमाणी
प्रकाशक रा. ज. देशमुख : सं. भटकळ
शेषन : अनु. अशोक जैन
देवगंधर्व : शैला दातार
मराठी कन्यांचा कल्पवृक्ष : सुधा चाफेकर
नारायण मे. लोखंडे : मनोहर कदम
घटप्रभेचा योगी : श्रीपाद केळकर
आधारवड : अविनाश टिळक
एडिसन : ह. अ. भावे
राजीव गांधींच्या सहवासात : राम प्रधान
श्री अरविंद : प्रभाकर नुलकर
साम्यवादी विनोबा : राम शेवाळकर
पंडित नेहरू : स. रा. गाडगीळ
ठाकरे फॅमिली : ज्ञानेश महाराव
ब्रम्हर्षींची स्मरणयात्रा : प. वि. वर्तक

**व्यक्तिचित्रे**

स्वैरसौहार्द : प्रभाकर जठार
स्नेहबंध : वि. भि. कोलते
वोई वंगला : वावू मोशाय
घाणेरीची फुलं : रामनाथ चव्हाण

**समीक्षा**

अमृतसिद्धी : स. ह. देशपांडे/ मंगला गोडवोले
एलकुंचवारांची नाट्यसृष्टी :
मराठी गझल : अविनाश कांवळे
कविता आणि रसिकता : रा. ग. जाधव
नाटकातील चिन्हं : राजीव नाईक
ग्रंथवैभव : शंकर सारडा
कविता - संकल्पना. : वसंत पाटणकर
ज्ञानेश्वरांचा अलौकिकतावाद : श्यामला मुजुमदार
स्पंदने श्रीसमर्थांची : यशवंत पाठक
मराठी नाटकातील संवाद : सुनीता सहस्रबुद्धे
लोकरंगभूमी : प्रभाकर पांडे
जयवंत दळवीं विषयी : मंगला आठलेकर
तिरकसपणातील सरळता : सं. राजन गवस
मराठी नाट्यपरंपरा : तारा भवाळकर
वाङ्मयेतिहास : गो. म. कुलकर्णी, दत्तात्रय पुंडे
मराठी वालसाहित्य : लीलावती भागवत
गांधीवाद आणि आधुनिक मराठी साहित्य : सं. दत्तात्रय पुंडे
गीतयात्री गदिमा : कल्याण इनामदार
जीए : जीवनदृष्टी आणि प्रतिमासृष्टी

*सं. त्र्यं. कुल्ली
कादंबरीकार दिघे : रवींद्र ठाकूर
आदिवासी साहित्य : डॉ. विनायक तुमराम
मालनगाथा : इंदिरा संत
अन्वय : सु. श्री. पांढरीपांडे
जयवंत दळवींची नाटके : सु. रा. चुनेकर
संतसाहित्य संदर्भ कोश : डॉ. कानडे
आजचे नाटककार : सं. पुंडे, तावरे

आत्मकथने
थोट्या : रामदास म्हात्रे
शिवण्यापासून लिवण्यापर्यंत : रमण माळवदे
शतदा प्रेम करावे : अरुण दाते
आत्मचरित्राऐवजी : जयवंत दळवी
धूळपाटी : शांता शेळके
प्रारंभ : रमेश मंत्री
माझी अक्षरयात्रा : कमल शेडगे
वादळवाटा : प्रा. विलास पाटील
उद्योगपर्व : वी. जी. शिर्के
माझा नाटकी संसार : मामा वरेरकर
प्राचार्य : डॉ. ना. य. डोळे
सुमित्रासंवाद : व. दि. कुलकर्णी
रंग नटेश्वराचे : गणपत पाटील
प्रकाशकनामा : मधुकाका कुलकर्णी
वादळमाथा : राम प्रधान
राष्ट्रपती भणतातील वादळी वर्षे : व्यंकटरमण
इंदिरा - अंतिम पर्व : पी. सी. अलेक्झांडर
अश्रूंशी नाते : मीना देशपांडे
घराकडील गोष्टी : वत्सला पाटील
जेथे जातो तेथे : नानासाहेब तळवलकर
मी भग्न पावले आहे : मेहरुन्निसा दलवाई

इतर
भेदविलोपन : एक आकलन : अशोक केळकर
भावपेशी : डॉ. अरुण गद्रे
जनमन : अरुण टिकेकर
शतकांचा संधिकाल : दिलीप पु. चित्रे
ज्ञानदेवांच्या वनश्रीतील पर्यावरण : गजानन खोले
वेस्ट ऑफ दळवी : संपादक - सुभाष भेंडे
नववसाहतवाद आणि आधुनिक भारत : गोपाळ राणे
भारूड व लोकशिक्षण : रामचंद्र देखणे
महात्मा गांधी विचारदर्शन : नागोराव कुंभार
गुलिस्तान - ए - गजल : विनय वाईकर
जीएंची निवडक पत्रे : सं. हातकणंगलेकर/ श्री. पु. भागवत
सिनेमाची चित्तरकथा : अशोक राणे
अयोध्याविवाद : शेखर सोनाळकर
तारतम्य २ : अरुण टिकेकर
महाराष्ट्रातील सत्तांतर : व्होरा, पळशीकर
वस्ती : वसंत मून
घरट्यापलीकडे : मारुती चितमपल्ली
ठाकरवाडी : रणसिंग
पातंजल योगदर्शन : शरच्चंद्र कोपर्डेकर
दंभस्फोट : ना. भा. खरे
समाजपरिवर्तनाच्या दिशा : जनार्दन वाघमारे
अणुविवेक : दिलीप कुलकर्णी
कुटुंबकथा : वसुंधरा पेंडसे नाईक
भाषणरंग : अशोक दा. रानडे
खाडीयुद्ध ९१ : तिवारी अनु. पांडे











श्रद्धांजली

# वामनराव चोरघडे

## अनंत अंबादास कुलकर्णी

दिवाकर कृष्ण, वि.सी. गुर्जर, वि. स. खांडेकर, य. गो. जोशी, वि. वि. बोकील, दत्त रघुनाथ कवठेकर यांचे कथालेखन मावळत आलेले होते. अशा वेळी अगदी नव्या प्रकारची कथा वामनराव चोरघडे वाचकांना देऊ लागले. केवळ घटना, प्रसंग, जीवनाचे सत्य वास्तव सांगावयाचे काम वामनरावांना कथेतून करावयाचे नव्हते. त्यांच्या दृष्टीने असे कथन हे वृत्तलेखकाचे काम होय. ललित लेखकाचे नव्हे. ललित लेखकाने केवळ जग दाखवू नये, उपदेश करू नये, स्वतःचे विश्व उभारावे व त्या विश्वाचा पडताळा वाचकावर सोपवावा. वामनराव म्हणत, " मी पुष्कळ निसर्ग पाहिला. बरे वाईट अनुभव घेतले. निसर्गात काय किंवा अनुभवात काय, अद्‌भूत असे काही मला प्रथम गवसले नाही. जे काही थोडे फार गवसले त्यामुळे कल्पनाशक्तीला तीव्रता आणता आली. त्या अनुभवांचे थोडेसे टाचण, त्यात बरेचसे कल्पनेचे पाणी, सत्याचे लिंबू आणि सत्याभासासाठी साखर घालून मी प्रारंभीच्या गोष्टी लिहिल्या. त्याकाळी मला काही भास होत, काही स्वप्ने पडत. त्यांचा उपयोग मी माझ्या कथा लेखनात केला. वाचकांना माझ्या या कथा आवडत गेल्या. नव्या वाटल्या. मला लिहावेसे वाटत होते म्हणून मी लिहीत होतो. क्रिकेट खेळावे, टेनिस खेळावे असेही वाटे. पण आर्थिक परिस्थिती अनुकूल नव्हती. व्यायाम आणि वाचन लेखन यांना पैसा लागत नव्हता. स्वतःचा स्वैपाक,धुणेपाणी हे घरकाम व शाळाकॉलेजचा अभ्यास करावयास पैसा लागत नव्हता. म्हणून भरपूर वाचले वा काही लिहिले. सुदैवाने म्हणा दुर्दैवाने म्हणा, खूप पुढे बरे वाईट अनुभव आले. येत गेले. जीवनाच्या या वाटचालीत नवे नवे अनुभव घेण्याचे स्वातंत्र्य होते. अडविणारे कोणी नव्हते. मुळात घराण्याचे काही चांगले संस्कार होते. आपण पाहिलेले, भोगलेले लोकांना सांगावे अशी उर्मी येई तळमळ लागे त्यामुळे लिहीत गेलो. लेखनाची मनोभावे साधना केली. साधना करीत असताच वाटेः अरे, मनाचे रांजण भरलेले आहेत. तेव्हा जमेल तितके लिहावे म्हणून लिहीत गेलो. माझ्या कथालेखनावर कुणाचे संस्कार, परिणाम झाले का? तर मी म्हणतो: अप्रत्यक्ष झाले असल्यास मला माहीत नाही. कारण मी तोपर्यंतच्या सर्व मराठी कथा समजून उमजून वाचलेल्या होत्या. खांडेकर फडके मला आवडलेले लेखक. पण मी कुणाचेही अनुकरण केले

नाही . कोणी म्हणत माझ्या कथांवर गांधीवादी विचारांची छाप आहे . हे मला बिल्कुल मान्य नाही . कोणी म्हणत तुम्ही अगदी नवी कथा वाचकांना देत आहात . माझ्या मते कथेत जुने नवे काही नसते . कथा कथाच असते . काळाच्या ओघात तिचा चेहरामोहरा बदलतो . माणूस माणूसच असतो . कपडे पेहेराव बदलले की अंमळ वेगळा भासतो . बदलतो असे नाही . आत्मा तोच , निरनिराळ्या जन्मी निरनिराळ्या प्राणीमात्रांचे कुडीत विसावतो . गंगा ऋषिकेशची निराळी आणि हरिद्वारची निराळी नसते . पाणी तेच असते . वामनरावांचे हे मत असले तरी माझ्या मते वामनरावांनी अनेक कथांतून मानवी मनाची नाजूक स्पंदने दाखवलेली आहेत . तशी पूर्वीच्या कथात नव्हती . म्हणून १९४० च्या सुमारास कथेचे हे वेगळे वळण होते . पुढे १९४० नंतर आलेल्या भावे , गाडगीळ , गोखले , माडगूळकर यांना वाट दाखविणारे होते असे मला वाटते . जुन्या नव्या कथाकारांच्या मधला बदल वामनरावांच्या कथांनी स्पष्ट केला असे म्हणावे लागेल .

एक प्रकाशक म्हणून मी लेखकाचे लिखाण नीट वाचल्याशिवाय , लेखकाशी प्रत्यक्ष ओळख झाल्याशिवाय , त्याच्या लिखाणात काय चांगले आहे , काय बेताचे आहे हे पाहिल्यावोलल्याशिवाय ललित लिखाण प्रसिद्र केलेले नाही . तेव्हा अमुक एक लेखक त्याच्या लेखनापेक्षा माणूस म्हणून मोठा असे काही थोडे लेखक मला माहीत आहेत . केवळ कठोर सत्यच वामनरावांनी लिहिलेले नसले तरी माणूस म्हणून वामनराव मोठे स्वच्छ गृहस्थ होते

साधी राहणी व उच्च विचारसरणी त्यांच्या आचारविचारात अवश्य होती . त्यांचा नित्याचा पोषाख साधा असे . पायघोळ लेंगा व नेहरू शर्ट यात ते मोठे रुबाबदार दिसत .ते आमच्या घरी कुटुंबातीलच एक असे वागत असत . माझ्या मुलानातवंडांचे लाड करीत . त्यांना गोष्टी सांगत . नातवंडांना ते आजोबा वाटत . इतके वामनराव त्यांच्याशी प्रेमाने वागत . जेवताना पाहुण्याचा संकोच ते करीत नसत . भाकरी केलेली नसली तर 'अहो वहिनी , चांगली खरपूस भाकरी भाजा . त्याशिवाय माझे पोट भरणार नाही ' म्हणत . लसणाची चटणी , त्यावर भरपूर तेल अशी तेलभाकरी त्यांना लागत असे . मोठ्या चवीने ती ते खात .

त्यांचे लहानपण आईवडिलांच्या सोवळ्या संस्कारात गेले . देवधर्म , नामस्मरण ते करीत . व्यायाम हौसेने खूप करीत . मारुती या वलभीमाची पूर्जाअर्चा , प्रदक्षिणा घातल्याशिवाय अन्न घेत नसत . त्यांचे मातुलघराणे ती . दादा धर्माधिकारी यांचे . दादा धर्माधिकाऱ्यांनी त्यांच्यावर लहानपणी खूप चांगले संस्कार केले असे ते गुरुऋण म्हणून सांगत . पुढे वर्ध्याला त्यांच्या आयुष्याची वारा वर्षे गेली . गांधी , विनोवा , कालेलकर वजाज यांच्याशी त्यांचा संवंध आला . विनोवांच्या कडून ते ज्ञानेश्वरी शिकले . विनोबांच्या सहवासातील एकूण ६०० तासांचे गीता-ज्ञानेश्वरी-गीताई यांचे शिक्षण व समजून घेणे त्यांच्या आयुष्यात फार महत्त्वाचे ठरले . १९४२ च्या तुरुंगवासात देशभरातले अनेक छोटे मोठे देशभक्त व पुढारी त्यांना पाहावयाला व ऐकावयाला मिळाले . या सर्वांचे त्यांच्या वागण्यात व लिहिण्यात प्रतिविंव पडले नसते

तरच नवल होते. माणूस म्हणून वामनराव असे गुणी व संस्कारक्षम होते.

त्यांनी व मी मिळून काही वर्षे प्रकाशनाचे मोठे कार्य केलेले आहे. हे लक्ष्मणशास्त्रीजींच्या मराठी विश्वकोशात गौरवपूर्ण शब्दात नमूद आहे. महाराष्ट्र विद्यापीठ ग्रंथनिर्मिती मंडळातर्फे विद्यापीठाच्या पदवीपरीक्षांना उपयोगी पडतील अशी सुमारे ५०० पुस्तके प्रसिद्ध करावयाची होती. केंद्र सरकारची सुमारे एक कोट रुपयांची रक्कम महाराष्ट्र राज्य सरकारतर्फे हाती येणार होती. हस्तलिखिते वामनरावांनी शेकडो लेखकांकडून लिहून घेतली. ती प्रकाशित करण्याचे काम मी करावे असे सुचविण्यात आले होते. महाराष्ट्रातील सर्व विद्यापीठांचे कुलगुरू मंडळाचे सभासद म्हणून होते. अध्यक्ष महाराष्ट्राचे शिक्षणमंत्री. सारा महत्त्वाचा आर्थिक व्यवहार माझ्यावर सोपवून वामनराव निश्चिंत होते. हे काम वामनरावांनी डॉ. वि. भि. कोलते, त्यावेळचे नागपूर विद्यापीठाचे कुलगुरू यांच्या मैत्रीमुळे स्वीकारले आणि कोलते, शिवाजी विद्यापीठाचे अप्पासाहेब पवार आणि वामनराव यांच्या आग्रहामुळे मी पत्करले. दोनशे पुस्तके होई पर्यंत वामनराव माझ्याबरोबर होते. पुढे ते निवृत्त झाले. तीनशे पुस्तके होईपर्यंत मी मंडळाचे काम १२ वर्षे निपटले. पुढे मीही निवृत्त झालो. वामनरावांनी १९०० रुपये पगाराची नोकरी सोडून फक्त १००० रुपये पगारावर मंडळाचे चिटणीसपद पत्करले होते. मी विनावेतन या मंडळाचा प्रकाशक झालो होतो. नियंत्रक होतो. मी हे वामनरावांच्या मैत्रीमुळे केले. त्या काळात वामनराव वयाने, शिक्षणाने माझ्यापेक्षा मोठे असूनही बंधुभावाने, क्वचित काही प्रसंगी वडील भावाचा मान देऊन मला वागवीत होते.

असा हा भला माणूस आणि थोर कथालेखक माझा स्नेही वामनराव आज काळाच्या पडद्याआड गेला असला तरी माझ्या हृदयात तो मी असेपर्यंत असेलच असेल!

(म. सा. परिषदेत दिलेल्या भाषणाचा काही भाग)

* कवितांगण : सिंधू आगाशे, प्रकाशक सिंधू आगाशे, पृष्ठे ५६, पंचवीस रुपये.
* हसता हसता : अरुण शिंदे, इंद्रायणी प्रकाशन पुणे, पृष्ठे ८८, वीस रुपये.
* ज्ञानेश्वरांचे चमत्कार : विश्वनाथ खैरे, संमत प्रकाशन, पुणे. पृष्ठे ६८, चाळीस रुपये.
* वेदातली गाणी : विश्वनाथ खैरे, संमत प्रकाशन, पुणे पृष्ठे ६६, तीस रुपये.
* भेट : ज्ञानेशमोळक, कवी वनिता, उत्कर्ष प्रकाशन, पुणे. पृष्ठे ६८, पंचेचाळीस रुपये.
* वाठार-तासगावकर सोवनी घराण्यांचा वृत्तांत : संपादक, म. वि. सोवनी, पृष्ठे १४४, शंभर रुपये.
* Indian Literature : Issues and Explorations : Gangadhar Gadgil, D. K. Publishing Corporation Delhi, P 148, Rs. 150. /-

## नवती महोत्सवासाठी
## देणगी देणाऱ्यांची नावे

| | | |
|---|---|---|
| १) श्रीमती संजीवनी मराठे | (पुणे) | ५००/- |
| २) श्री. प्रमोद आडकर | (पुणे) | १००/- |
| ३) श्रीमती शांतावाई राजंदेकर | (पुणे) | ५००/- |
| ४) श्री. ल.रा. कोवळे | (पुणे) | १०१/- |
| ५) सौ. शीला मराठे | (ठाणे) | ५०१/- |
| ६) श्री.विजय जाधव | (पिंपरी ,पुणे) | १०१/- |
| ७) सौ.मीरा शिंदे | (पुणे) | १५१/- |
| ८) श्री.रत्नाकर अनंत कुलकर्णी | (पुणे) | ९००१/- |
| ९) श्री.सुधाकर वा.जोशी | (पुणे) | १०००/- |
| १०) डॉ.गं.ना.जोगळेकर | (पुणे) | ५००१/- |
| ११) श्री.राजाभाऊ फडणीस | (पुणे) | २००१/- |
| १२) श्री. राजेंद्र वनहट्टी | (पुणे) | १०००१/- |
| १३) सौ अनुराधा नारायण आठवले | (हडपसर ,पुणे) | ५०१/- |
| १४) श्री.नारायण गजानन आठवले | (हडपसर ,पुणे) | १००१/- |
| १५) श्री. दत्तात्रय दामोदर ओरणे | (पुणे) | २०१/- |
| १६) श्री. प्रमोद गणेश ओक | (पुणे) | १०००/- |
| १७) प्रा. वसंत दीक्षित | (अहमदनगर) | २००/- |
| १८) श्री.प्रभाकर अत्रे(आश्रयदाते) | (पुणे) | २५०००/- |
| १९) श्री.रंगा मराठे | (पुणे) | १००१/- |
| २०) श्री.मधुकरराव परांजपे | (पुणे) | १००१/- |
| २१) श्री.रवींद्र भट | (पुणे) | ५०००/- |
| २२) श्री.ना.गो.जोशी | (पुणे) | २५००/- |
| २३) श्री.ह.ल.निपुणगे | (पुणे) | १००१/- |
| २४) श्री.एम.व्ही.भावे | (पुणे) | १०००/- |
| २५) श्री.सर्जेराव घोरपडे | (पुणे) | १०,०००/- |
| २६) डॉ. द. वि. जोग | (मुंबई) | २५१/- |
| २७) श्री.म.श्री.जोशी | (मुंबई) | १००/- |



अनुक्रमणिका

## साभार पोच

* काव्यांगण : संपादक - अरविंद दीक्षित, जागतिक मराठी अकादमी ,नवी दिल्ली. पृष्ठे ५४, पंचवीस रुपये
* वशिल्याचे तट्टू : बाळ गाडगीळ, मधुराज प्रकाशन, पुणे. पृष्ठे १९६, एकशे दहा रुपये.
* फरसाण : मनोहर सप्रे, नील प्रकाशन, चंद्रपूर. पृष्ठे १४४, सत्तर रुपये.
* कलमी आंबे : गो. या. सावजी, ऋचा प्रकाशन, नागपूर, पृष्ठे ११०, पासष्ठ रुपये.
* मुक्ती : अनुवादक - अनु भागवत, माधवी दावक प्रकाशन, पुणे. पृष्ठे १२८, पन्नास रुपये.
* आकाशातील रत्ने : विनय पट्टनायक, अनु. - कल्याणी अभ्यंकर व सुचेता चांदककर, विद्या प्रकाशन, पुणे. पृष्ठे ७०, पंचाहत्तर रुपये.
* चिमाजी आप्पा पुणेकर : अनंत विठ्ठल गाडगीळ, अमेय प्रकाशन, पुणे. पृष्ठे ११७, साठ रुपये.
* नवभारताचे शिल्पकार : डॉ. स.रा. गाडगीळ, शलाका प्रकाशन, मुंबई. पृष्ठे ४१३, दोनशे रुपये.

**साकेत प्रकाशन, औरंगाबाद**

* विज्ञान छंद मंडळ : सुधाकर भालेराव, पृष्ठे १०७, साठ रुपये.
* पंचतंत्राच्या गोष्टी : बाबा भांड, पृष्ठे ८८, चाळीस रुपये.
* टिट्टू : धारा भांड, पृष्ठे ४८, पंचवीस रुपये.
* अवि आणि मीना : प्रा. म.सु. पगारे, पृष्ठे ४४, पंचवीस रुपये.
* स्वयंरोजगारासाठी अर्थसहाय्य : जे.के. जाधव, पृष्ठे १११, साठ रुपये.
* दुःख आणि अश्रू : ललिता गदगे, पृष्ठे ११८, साठ रुपये
* नववसाहतवाद आणि आधुनिक भारत : प्रा. गोपाळ राणे, कालिंदी राणे प्रकाशन, गोरेगाव (प.) मुंबई. पृष्ठे ३३४, अडीचशे रुपये.
* कसोटी : सूर्यकांतभाई शहा, श्रीसंतोषी माता प्रकाशन, पुणे. पृष्ठे १४०, पंचाहत्तर रुपये.
* वाडा चिरेबंदी० : एक अवलोकनः कमलेश, संदर्भ प्रकाशन, पुणे. पृष्ठे १६०, एकशे दहा रुपये.
* आभाळ मोकळी : मीरा शिंदे, साहित्य प्रकाशन, पुणे. पृष्ठे ७५, तीस रुपये.
* अशी मने असे नमुने : शिवाजी सावंत, कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणे. पृष्ठे १६८, सत्तर रुपये.
* ज्योती कलश : सौ. ज्योती ढमढेरे, पद्मगंधा प्रकाशन, पुणे. पृष्ठे ५९, चाळीस रुपये.
* ज्ञानेश्वरांची अलौकिकतावाद : डॉ. श्यामला मजुमदार, मनोहर प्रकाशन, नागपूर. पृष्ठे ३१०, एकशे ऐंशी रुपये.
* वर्तुळ : त्रिवेणी कुमार कोलंबीकर, मराठवाडा साहित्यिक मित्रमंडळ, पृष्ठे ४८, तीस रुपये.



अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्था
(महाराष्ट्र शासन पुरस्कृत)
एल्फिन्स्टन तांत्रिक वियालय,३, महानगरपालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४०० ००१.
दूरध्वनी - २६६ ५७ ६१

# मराठीच्या विकासासाठी काम करणाऱ्या व्यक्ती व संस्थांना आवाहन

आधुनिक माहिती माध्यमांवर मराठी भाषा सहजतेने वापरता यावी, रुळावी या दृष्टीने राज्य मराठी विकास संस्थेतर्फे विशेष प्रकल्प हाती घेण्यात येत आहे. संगणक, माहिती महाजालक (इंटरनेट) आदींसाठी मराठीकरिता विशेष आज्ञाप्रणाली (सॉफ्टवेअर) तसेच शब्दसंग्रह (डिक्शनरी, थेसॉरस इ.) व माहितीकोश (इन्फॉर्मेशन बँक) निर्माण करण्याचा प्रकल्प संस्थेतर्फे सुरू करण्यात येत आहे.

महाराष्ट्रात तसेच परदेशातही अनेक व्यक्ती संस्था या दृष्टीने उपयोगी ठरू शकतील असे विविध उपक्रम करीत आहेत. या उपक्रमांमधून निर्माण केलेल्या विविध गोष्टींचा जास्तीत जास्त उपयोग करून घ्यावा आणि नवीन आज्ञाप्रणाली, संग्रह व कोश बनवताना पुनरावृत्ती टाळावी म्हणून अशा उपक्रमांची, त्यांच्या सध्याच्या स्थितीची व भविष्यकाळातील अपेक्षित प्रगतीची माहिती गोळी करून संगणकावर त्याचा माहितीसंग्रह (डाटाबेस) निर्माण करण्याचे ठरले आहे. विविध प्रकारचे शब्दसंस्कारक (वर्ड प्रोसेसर), इंग्रजी व मराठी व मराठी व मराठी-इंग्रजी शब्दार्थ कोश, मराठी समानार्थ (सिनॉनिम्स) व विरुद्धार्थ (अँटॉनिम्स) शब्दकोश (थेसॉरस), शुद्धलेखन, व्याकरण, मराठी भाषेतील उच्चार व्हावेत या दृष्टीने लिपीतील सुधारणा, वोल संश्लेषकावर (स्पीच सिंथेसायझर) मराठीचा उपयोग, महाजालकावर (इंटरनेट) मराठीचा उपयोग, विविध प्रकारचे माहितीसंग्रह आणि कोश आदि विषयांवर काम करणाऱ्या विविध व्यक्तींनी आणि स्वयंसेवी तसेच व्यापारी तत्त्वावर काम करणाऱ्या संस्थांनी आपली माहिती - आपले नाव, पत्ता, दूरध्वनी क्रमांक, कार्यक्षेत्र, कार्याचे स्वरूप, सध्या झालेली प्रगती व पुढच्या प्रगतीसाठी आखलेला कार्यक्रम या गोष्टींसह राज्य मराठी विकास संस्थेकडे ३१ मार्च १९९६ पर्यंत सुर्धीर थत्ते, संयोजक, मराठी संगणक व महाजालक प्रकल्प, द्वारा राज्य मराठी विकास संस्था, एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, पहिला मजला, ३ महापालिका मार्ग, धोबीतलाव, मुंबई ४०० ००१ या पत्त्यावर पाठवावी असे आवाहन डॉ. सरोजिनी वैद्य, संचालिका, राज्य मराठी विकास संस्था यांनी केले आहे.

# कार्यवृत्त

दि. ६ ऑक्टो. ९५ : म.म. द. वा. पोतदार स्मृतिपुरस्कार प्रा.ग.प्र.प्रधान यांच्या हस्ते श्री. वि.स. वाळिंबे यांच्या '१९४७' या ग्रंथाला देण्यात आला.

दि. ९ आक्टो ९५ : विद्याधर पुंडलिक यांच्या स्मरणार्थ दिला जाणारा स्मृतिपुरस्कार मोहन धारिया यांच्या हस्ते यदुनाथ थत्ते यांना 'साथी सांगाती' या पुस्तकाला देण्यात आला.

दि. १६ आक्टो. ९५ : व. ह. गोळे स्मृतिदिनानिमित्त ज्येष्ठ चित्रपट कलावंत चंद्रकांत गोखले यांची प्रकट मुलाखत श्री. वापू वाटवे यांनी घेतली.

दि.७ नोव्हें. ९५ : सुप्रसिद्ध कादंबरीकार आणि परिषदेचे उपाध्यक्ष शिवाजी सावंत यांना 'मूर्तिदेवी' पुरस्कार मिळाल्यावद्दल परिषदेचे अध्यक्ष राजेंद्र वनहट्टी यांच्या हस्ते सत्कार करण्यात आला. वि.स.वाळिंवे व अरुण खोरे यांनी त्यांची प्रकट मुलाखत घेतली.

दि. २७ नोव्हें. ९५ : अहिताग्नी राजवाडे स्मृतिदिनानिमित्त 'मराठी संताचे तत्त्वज्ञान' या विषयावर प्रा. ह. श्री. शेणालीकर यांचे भाषण झाले.

दि.२९ नोव्हें.९५ : ६९ व्या अ.भा. मराठी साहित्य संमेलनाच्या नियोजित अध्यक्षा शान्तावाई शेळके यांचा सत्कार म.सा.प.चे अध्यक्ष राजेंद्र वनहट्टी यांच्या हस्ते करण्यात आला. प्रास्ताविक कार्याध्यक्ष डॉ. गं.ना. जोगळेकर यांनी केले. डॉ. कल्याणी दिवेकर व प्रा. रा.ग. जाधव यांनी गौरवपर भाषणे केली. आभार रवींद्र भट यांनी मानले. या समारंभाचे सूत्रसंचालन रत्नाकर कुलकर्णी यांनी केले.

याच कार्यक्रमानंतर माधव जूलियन स्मृतिदिनानिमित्त कविसंमेलन झाले. त्याचे सूत्रसंचालन डॉ. शंतनू चिंधडे यांनी केले.

दि. ४ ते ११ डिसें. ९५ : दरवर्षीप्रमाणे म.सा.प. तर्फे का.र.मित्र व्याख्यानमाला आयोजित करण्यात आली. चित्रपटाला शंभर वर्षे पूर्ण झाल्यानिमित्त 'मराठी साहित्य आणि मराठी चित्रपट' या विषयावर वापू वाटवे, खंडेराव केळकर, वि.वि.वापट, द.मा.मिरासदार, माधव वझे, विश्वास मेहेंदळे, गंगाधर महांवरे व डॉ. श्रीराम लागू हे वक्ते या व्याख्यानमालेत सहभागी झाले हाते.

दि. २२ जाने. ९६ : महाराष्ट्र फौंडेशन ट्रस्टचा पुरस्कार प्राप्त झाल्यावद्दल कॉन्टिनेंटल प्रकाशनचे संचालक व म.सा.प. चे माजी कोषाध्यक्ष अनंतराव कुलकर्णी व म.सा.प. चे उपाध्यक्ष गो. म. कुलकर्णी यांचा परिषदेचे अध्यक्ष राजेंद्र बनहट्टी

यांच्या हस्ते सत्कार करण्यात आला: श्रीपाद जोशी व डॉ. द. दि. पुंडे यांचा गौरवपर भाषणे झाली.

**दि. २४ जाने. ९६ :** कै. द. रा. वेंद्रे यांच्या जन्मशताब्दीनिमित्त त्यांचे व्यक्तित्व आणि कवित्व या विषयावर डॉ. पंडित आवळीकर यांचे भाषण झाले

## म.सा.प.ठाणे जिल्हा शाखा

**दि. १६ एप्रिल ९५ :** एक दिवसाचा परिसंवाद व शिबिर घेण्यात आले. 'मराठी साहित्य संशोधन - नव्या दिशा' या परिसंवादात डॉ. लीला गोविलकर, डॉ. द. दि. पुंडे, डॉ. अनंत देशमुख, प्रा. दिगंबर पाध्ये, डॉ. कल्याण काळे व प्रा. रमेश तेंडुलकर यांनी भाग घेतला. परिसंवादाचे उद्घाटन डॉ. य. दि. फडके यांनी केले.

**दि. १८ जून ९५ :** संस्थेच्या १६ व्या वर्धापनदिनानिमित्त "इतिहासातील क्षणचित्रे" या विषयावर अरविंद नाटके यांचे भाषण.

**दि. २४ सप्टें. ९५ :** प्रा. म. वि. फाटक यांच्या स्मृतिदिनानिमित्त "गौरी देशपांडे यांचे साहित्य" या विषयावर प्रा. पुष्पा भावे यांचे भाषण.

**दि. १७ सप्टें. ९५ :** श्री. त्र्यं. आठले यांच्या 'वीणारव' या काव्यसंग्रहाचे रवींद्र भट यांच्या हस्ते प्रकाशन.

**दि. ५ नोव्हें. ९५ :** श्री. दया पवार यांची प्रा. प्रज्ञा लोखंडे व नीलिमा पाळवणकर यांनी प्रकट मुलाखत घेतली.

**दि. २६ नोव्हें. ९५ :** रोजी ठाणे शाखेच्या वतीने 'शाखा मेळावा' आयोजित करण्यात आला होता. शाखांचे फारच थोडे प्रतिनिधी उपस्थित होते. म.सा.प. पुणे च्या वतीने श्री. गं. ना. जोगळेकर, रवींद्र भट, रत्नाकर कुलकर्णी, कल्याणी दिवेकर व राजा फडणीस उपस्थित होते. शाखा प्रतिनिधींनी मागणी केल्यामुळे श्री. म. माटे स्मृतिदिन डोंबिवली व कल्याण, वि. द. घाटे स्मृतिदिन पिंपरी चिंचवड, नरहर कुरुंदकर स्मृतिदिन पिंपरी - चिंचवड, पिलाजीराव फडणीस स्मृतिदिन इचलकरंजी, ना. गो. चाफेकर स्मृतिदिन बदलापूर तर बा. सी. मर्ढेकर स्मृतिदिन बारामती यांना देण्यात आले. परिषदेच्या वतीने जोगळेकर, रवींद्र भट व राजा फडणीस यांनी वेगवेगळ्या प्रश्नांना उत्तरे दिली. रत्नाकर कुलकर्णी यांनी आभार प्रदर्शन केले.

**दि. १८ जाने. ९६ :** ६९ व्या अ.भा.म. साहित्य संमेलनाच्या अध्यक्षा शांता शेळके यांचा सत्कार. नीलिमा पाळवणकर व प्रवीण दवणे यांनी गौरवपर भाषणे केली

## म.सा.प. धुळे जिल्हा शाखा

**दि. ६ ऑक्टो. ९५ :** सौ. सुषमा गरुड यांच्या "समश्लोकी मराठी रामरक्षा या ग्रंथाचे प्रकाशन प्रा. प्रकाश पाठक यांच्या हस्ते झाले. अध्यक्षस्थानी डॉ. मु. ब. शहा होते.

**दि. १७ ऑक्टो. ९५ :** श्री. मा. य. वैद्य यांच्या "वाघिणीचे दूध" या ग्रंथाचे प्रकाशन प्रा. रा. ग. जाधव यांच्या हस्ते झाले. यावेळी प्रा. व. गो. बोकटे व डॉ. दिलीप पाटील यांची भाषणे झाली.

**दि. ३१ ऑक्टो. ९५ :** कै. अनंतराव पाटील यांच्या स्मृतिदिन साजरा करण्यात आला. अध्यक्षस्थानी प्रा. सी. आय. मोरे होते. प्रमुख पाहुणे बाबूराव बागूल उपस्थित होते. यावेळी प्रा. सर्विकार यांचे भाषण झाले

दि. २७ नोव्हें. ९५ : महात्मा फुले पुण्यतिथी साजरी करण्यात आली. अध्यक्षस्थानी डॉ. श्रीराम लागू होते. विजया चौक व सरोज कांबळे यांची भाषणे झाली.
दि. २४ जाने. ९६ : कै. भाऊ देशपांडे यांचा स्मृतिदिन साजरा करण्यात आला. अध्यक्षस्थानी प्रा. पुरुषोत्तम पाटील होते. प्रास्ताविक भगवान टाकूर यांनी केले. या निमित्ताने कविसंमेलन झाले. प्रा. अनिल सोनार यांचा धुळेजिल्हा नाट्य परिषदेचे अध्यक्ष म्हणून आणि प्रा. कैलास सार्वेकर यांचा पीएच. डी मिळाल्याबद्दल सत्कार करण्यात आला. प्रा. अर्चना हातेकर यांनी सूत्रसंचालन केले तर सौ. देवरे यांनी आभार मानले.

## म.सा.प. पिंपरी - चिंचवड शाखा

दि. १३ व १४ जाने. ९६ : शाखेच्या वतीने निसर्गाच्या सान्निध्यात साहित्यिक गप्पाटप्पांचा कार्यक्रम आयोजित करण्यात आला.
दि. १८ जाने. ९६ : वि. द. घाटे यांचा स्मृतिदिन संपन्न.
दि. १० फेब्रु. ९६ : नरहर कुरुंदकर स्मृतिदिन साजरा.

## म.सा.प. श्रीरामपूर शाखा

दि. १० जाने. ९६ : 'ज्ञानेश्वर जीवन व कार्य' या विषयावर रवींद्र भट यांचे भाषण झाले. प्रास्ताविक कार्याध्यक्ष सौ. मीनाताई जगधवे यांनी केले. अध्यक्षस्थानी ॲड. रावसाहेब शिंदे होते.

## म.सा.प. इस्लामपूर शाखा

दि. १३ व १४ जाने. ९६ : शाखेच्या वतीने ८ वे विभागीय साहित्य संमेलन आयोजित करण्यात आलेले होते. पूर्वतयारीसाठी दि. १० डिसें. ९५ रोजी म.सा.प. पुणे च्या वतीने राजा फडणीस, रत्नाकर कुलकर्णी इस्लामपूरला गेलेला होते. म.सा.प. पुणे व राजारामबापू ज्ञान प्रबोधिनीच्या सहकार्याने हे संमेलन झाले. अध्यक्ष संमेलनाचे उद्घाटन आमदार जयवंतराव पाटील यांनी केले. परिषदेचे उपाध्यक्ष श्री. शिवाजी सावंत यांची प्रकट मुलाखत प्रा. अविनाश सप्रे यांनी घेतली. परिषदेचे उपाध्यक्ष रामदास फुटाणे यांच्या अध्यक्षतेखाली कवी संमेलन झाले. परिषदेच्या वतीने त्यात भगवान टाकूर, डॉ. शंतनू चिंधडे व डॉ. निशिकांत श्रोत्री यांनी आणि परिसंवादात डॉ. कल्याणी दिवेकर व हरी नरके यांनी भाग घेतला.

माजी संमेलनाध्यक्ष द. मा. मिरासदार यांच्या अनुपस्थितीत परिषदेचे कार्यवाह रत्नाकर कुलकर्णी यांनी ८ व्या विभागीय संमेलनाचे नियोजित अध्यक्ष रावसाहेब कसबे यांना अध्यक्षपदाची सूत्रे प्रदान केली. कार्यवाह सु. प्र. कुलकर्णी यांनी परिषदेच्या वतीने आभार मानले.

## म.सा.प. डोंबिवली शाखा

दि. ८ एप्रिल ९५ : कवी म. पां. भावे यांच्या 'अरे संसार संसार' या विडंबन गीतांचा कार्यक्रम.
दि. २५ एप्रिल ९५ : महाराष्ट्र टाइम्सचे अशोक जैन यांचे 'पत्रकारिता आणि साहित्य' या विषयावर भाषण
दि. २६ एप्रिल ९५ : कै. आगरकर यांच्या जन्मशताब्दीनिमित्त रामदास भटकळ यांचे 'आगरकरांच्या वेळची सामाजिक परिस्थिती' या विषयावर भाषण.

दि. २७ एप्रिल ९५ : डॉ. अंजली कीर्तने यांचा डॉ. आनंदीबाई जोशी यांच्यावर कार्यक्रम झाला. आनंदीबाई यांच्या जीवनावरील लघुपटही दाखवण्यात आला.
दि. २८ एप्रिल ९५ : उज्ज्वला करंडे. माधवी घारपुरे व माधुरी अध्यापक यांचे कथाकथन
दि. २९ एप्रिल ९५ : कविसंमेलन
दि. ३० एप्रिल ९५ : खासदार प्रा. राम कापसे यांचे 'जीवनातील आनंद' या विषयावर भाषण
दि. १७ सप्टें. ९५ : डोंबिवलीतील पेंढारकर महाविद्यालयाच्या वतीने 'मराठी कविता - एक आनंदयात्रा' हा कार्यक्रम सादर करण्यात आला. सौ. मंगला सिन्नरकर यांनी सूत्रसंचालन केले.
दि. ३ डिसें.९५ : श्री ज्ञानेश्वर महाराज संजीवन समाधीच्या सप्तशताब्दीनिमित्त डॉ. ग. के. गुर्जर व श्री. प्रभाकर दिघे यांची भाषणे.
दि. २३ डिसें. ९५ : श्री. म. माटे स्मृतिदिनानिमित्त डोंबिवली शाखेच्या उपाध्यक्षा सौ. स्मिता तळेकर यांचे व्याख्यान व. शं खानवेलकर यांनी श्री. म. माट्यांच्या आठवणी सांगितल्या.

## सांगली रत्नाकर कुलकर्णी, कार्यवाह

महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या सांगली शाखेने गेल्या वर्षभरात अनेक कार्यक्रम केले. दि. १४ एप्रिल ९५ रोजी 'डॉ. आंबेडकर यांची पत्रकारिता' या विषयावर विलिंग्डन महाविद्यालयाचे प्राचार्य डॉ. हरिश्चंद्र निर्मळे यांचे व्याख्यान. अध्यक्षस्थानी आमदार व्यंकाप्पा पत्की हे होते.

सांगली परिसरातील चित्रकार अनिल दवडे यांच्या चित्रवहार या पुस्तिकेचे जिल्हाधिकारी संजय उवाळे यांच्या हस्ते प्रकाशन.

नामवंत कवी व ललित लेखक श्रीरंग विष्णु जोशी यांच्या अदृष्टाची सावली या पुस्तकाचे अर्बन बँकेचे संचालक प्रकाश विरगे यांच्या हस्ते प्रकाशन. अध्यक्ष- प्रा. वैजनाथ महाजन.

अनुवादावरील एक दिवसाचे चर्चासत्र- उद्घाटक डॉ. चंद्रशेखर जहागीरदार, डॉ. तारा भवाळकर, अरुणा दाते, प्रकाश विरजे, माधव माळी, चारुदत्त भागवत, ना. ई. कडलास्कर, डॉ. गो. रा. कुलकर्णी, राजाभाऊ ताम्हणकर यांचा सहभाग. प्रा. म. द. हातकणंगलेकर यांच्या हस्ते समारोप.

डॉ. तारा भवाळकर यांचा वैविध्यपूर्ण वाङ्मयीन कार्यकर्तृत्वाबद्दल सांगली शाखेच्या वतीने गोवा कला अकादमीचे संचालक सचिव श्री. विनायक खेडेकर यांच्या हस्ते प्रा. हातकणंगलेकर यांच्या अध्यक्षतेखाली सत्कार. डॉ. वि. वा. इनामदार, डॉ. गो. रा. कुलकर्णी, कवी गिरिवाल यांची गौरवपर भाषणे. अध्यक्ष कन्या महाविद्यालयाचे प्राचार्य पां. ज. ताम्हनकर हे होते. वर्षभरात आनंद परांजपे, प्रकाश विरजे, प्रकाश आपटे व सर्व पत्रकारबंधूंचे सहकार्य लाभले. सर्वांना धन्यवाद.

प्रा. सुभाष दगडे

जन्मशताब्दीनिमित्त अभिवादन

## द. रा. बेंद्रे

जन्म - ३१ जानेवारी, १८९६



चित्र - अनिल उपळेकर

अनुक्रमणिका

आळंदी येथील ६९ व्या अखिल भारतीय
मराठी साहित्य संमेलनाच्या अध्यक्षा

**श्रीमती शांता शेळके**

